# भगिनीद्वय.

( बंगालीवरून )

## सामाजिक कादंबरी.

लेखक,

रा. रा. बाळकृष्ण जिवाजी हडकर,

( महाराष्ट्राचा अरुणोदय, वंगसूर्यास्त, आदर्शरमणी
इत्यादि कादंबऱ्यांचे कर्ते. )





प्रकाशक,

हिंद एजन्सी, माधवबाग-मुंबई.

सन १९१८.

किंमत आठ आणे.

# अनुक्रमणिका.



# भगिनीद्वय.

## प्रथम परिच्छेद.

### प्रेमी युगल.




काश समुद्रांत डुबत उतरत, हंसत खेळत, नाचत कुदत असलेला चंद्रमा कोण जाणे कोठें चालला होता ! असंख्य तारकामंडल प्रस्फुटित कुसुमासमान त्याच्या मागें चाललें होतें. सरस वासंतिक वायु नाचत कुदत, जनांस हंसवीत खेळवीत वाहत होता. चांदणी रात्र. वसुंधरेनें वैधव्यदर्शक श्वेत वस्त्र परिधान केलें होतें.

अशा वेळीं एक युवक व एक युवती एका परम रमणीय उद्यानाच्या मध्यंतरीं असलेल्या पुष्करणीच्या कांठावर बसलीं होतीं. कांठ संगमरवरी दगडांनीं बांधलेला असून त्यांत उतरण्यासाठीं पायऱ्या केलेल्या होत्या; त्या पायऱ्यांवर हें प्रेमी युगुल बसलें होतें. त्यांच्या पायांजवळून सुनिर्मल वारिधारा वाहत होती. चंद्रमा यथेच्छ विहार करीत होता. केव्हां तो धावूं लागल्यासारखा व केव्हां स्थिर असल्याचा भास होई. खेळून दमल्यावर बालक जसें किंचित्काल विश्रांति घेतें आणि स्थिर होऊन आपल्या सवंगड्यांकडे टकमकां क्षणभर पहातें, तद्वत् चंद्रमाहि स्थिर दृष्टीनें पहात होता. विकसित झालेलीं नानापुष्पें दात्याच्या संपत्तिसमान आपला सौगंध चोहोंकडे फैलावीत होतीं. पवनराज त्यांच्याबरोबर थट्टा करावयास गुंतला होता. केव्हां एखाद्या फुललेल्या गुलाबास वांकवून दुसऱ्या डाहळीवर असलेल्या गुलाबाशीं त्याचें मीलन करीत होता. 'इश्श ! हें काय भलतंच !' असें म्हणून लाजेनें जणूं काय ते दोन्ही गुलाब आपलीं तोंडें फिरवीत होते.

पवन म्हणजे साऱ्यांना प्रिय ! उच्च असो वा नीच असो ! तो कोणाचीहि उपेक्षा करीत नाहीं. केव्हां तो दारिद्र्याच्या झोंपड्यांत शिरून तें सारें झोंपडेंच हालवून टाकतो, तर केव्हां धनिकांच्या महालांत शिरून तेथील दिव्यांच्या चिमण्यांवर आपला प्रभाव गाजवितो; केव्हां दाराखिडक्यांतून डोकावून पहातो. केव्हां लेखकांच्या खोलींत शिरून त्यानें लिहून ठेवलेल्या कागदांस मौजेनें इकडे तिकडे भिरकावून देतो केव्हां कोणी वाचीत असल्यास त्याच्या पुस्तकाचीं पानें फडफड उडवितो. केव्हां देव दर्शनास जाणाऱ्या अगर गच्चीवर उभें राहून चांदण्या रात्रीचें मनोहर सृष्टिसौंदर्यावलोकन करणाऱ्या रमणींच्या सुंदर केशकलापास विखरून टाकतो तर केव्हां कोणाच्या वस्त्राशीं क्रीडा करून त्याला अगदीं हैराण करून सोडतो. तोच हा रसिक पवन आज मनोहर चंद्ररश्मींत स्नान करीत हंसत होता, ज्या जागीं आमचा कथानायक व कथानायिका हीं उभयतां बसलीं होतीं तेथेंहि जावून पवन त्यांची वस्त्रें केव्हां केव्हां बाजूस सारी, तर केव्हां नायिकेच्या सुंदर केंसास भुरभुरे उडवून युवकाच्या खांद्यावर अगर पाठीवर नेऊन ठेवी. युवकयुवती कोण जाणे !–कां, बोलतां बोलतां मध्येंच थांबलीं. किंचित्कालानंतर युवतीनें प्रश्न केला, "मेल्यावर माणूस काय होतं योगेंद्र ?

योगेंद्र विस्मित होऊन म्हणाला, "हें काय भलतंच विनोदिनी ?"

विनोदिनी नभोमंडलाकडे पहात हळुहळू म्हणाली, "मी जर मेल्यं तर ?"

"कां बरें विनोद ! आज तुझ्या मनांत हे अमंगल विचार कां बरं आले ?"

"कोण जाणे ! अदृष्टाच्या गोष्टी कुणाला कळत असतात ? मी जर मेल्यं तर मेल्यावर काय होईन हें विचारतें आपल्याला."

"तूं एकटी नाही मरूं शकणार. तुझ्या मृत्यूबरोबर दुसऱ्याहि एका मनुष्याच्या मृत्यूचा दाट संबंध जडलेला आहे. तूं मेल्यास तोहि मरेल आणि तदनंतर दोघांनाहि अनंत जीवनाचा लाभ होऊन अक्षय स्वर्गांतही रहावयास मिळेल.

मंद हास्य करून विनोदिनीनें विचारिलें, "कोण बरं तो मनुष्य ?"

"त्याला का तूं ओळखत नाहींस ? ती भाग्यवान् व्यक्ति तुझ्यासमोरच उभी आहे.

तोंडावर वस्त्राचा पदर घेऊन हंसत विनोदिनी म्हणाली, "तुम्ही ?"

"कां-बरं यांत कां तुला संशय वाटतो ?"

" नाहीं, पण किनी तुम्हीं भारीच कठोर अंतःकरणाचे अहांत ! तुमचं सांगणं किती अनुचित आहे पहा ! मागें तुम्ही कलकत्त्यास गेलां, तेंव्हां नाहीं कुठं मला नेली ती ? मी आपली वेडी ! रडून रडून दिवस काढले. पुढें कुठं सातवे दिवशीं तुम्ही परतलां तिथून. एक क्षणहि मी आपल्याला सोडून राहिल्यें नाहीं नी आज तुम्ही मला एकटीला इथंच टाकून जाण्याची गोष्ट करतां ? जा, पण भोंवेल बरं माझा श्राप ! तीन दिवसांच्या आंतच तुम्हांस अधीर होऊन परत लोटावं लागेल हें मात्र लक्ष्यांत ठेवा. "

" विनोद ! तुला मी जाणून बुजून बळेंच सोडून का जात आहें ? तुला माहित नाहीं का ? बोल, ही एकच काय ती आतां माझी शेवटची परीक्षा उरली आहे. "

विनोदिनी मध्येंच म्हणाली, " जळ्ळी अशी परीक्षा पाहिजे तरी कशाला ? ज्यांनां नोकरी हवी असेल किंवा पैसे कमवायचे असतील, त्यांनीं हवीतर द्यायची परिक्षा. केवळ ज्ञानभांडारांत भर घालावी आणि समाजाच्या कांहीं उपयोगी पडावं या हेतूनं शिकणाऱ्यांस परीक्षा देऊन काय करायचं आहे ? "

" तुझं सांगणं कांहीं खोटं नाहीं. पण ज्या उद्देशानं मी चिकित्साशास्त्र शिकत आहें, तो उद्देश फलद्रूप व्हावयास परीक्षेची विशेष आवश्यकता आहे. "

" पण मला तर कसली आवश्यकता दिसत नाहीं. ईश्वरकृपेंकरून तुम्हांला कांहीं कोठं नोकरी चाकरी पाह्यला नकोच ! दुसऱ्यांच्या उपयोगीं पडावें आणि वैद्यकी शिकल्यापासून अनेक गरीब आसन्नमरण स्थितींतील रोग्यांवर अनंत उपकार करतां येतील असं आपण म्हणतां; अन् मोठ्या परिश्रमानें हा सर्व खटाटोप करतां. पण कलकत्त्यास डॉक्टरीचा अभ्यास करण्यांत आपला याहूनहि आणखी कांहीं निराळा उद्देश आहे हें आजच्या आपल्या बोलण्यावरून दिसतं. "

योगेंद्रानें हंसून म्हटलें, " तूं सांगतेस त्याशिवाय यांत माझा दुसरा कोणताही उद्देश नाहीं. तथापि परीक्षेचं प्रयोजन काय तें मी तुला सांगतों. चिकित्सकावर आणि त्याच्या औषधावर दृढ विश्वास असणं हें आरोग्याचें एक प्रधान लक्षण आहे. चिकित्सकानें डिग्र्या मिळविल्या असल्यास लोकांचा त्याजवर विश्वास असतो. इतक्यासाठींच परीक्षेची आवश्यकता. दुसरं हें कीं, थोडक्यासाठीं हातीं घेतलेलें काम अर्धवट टाकणें योग्य नाहीं. "

विनोदिनी स्तब्ध राहिली. तिला हें त्याचें बोलणें पटलें असावें असें तिच्या मुद्रेवरून दिसूं लागलें. क्षणभरानें योगेंद्र पुनः म्हणाला, " विनोदिनी, असं जर नसतं तर तुला

सोडून जाण्याची मला हौस का होती ? तुला सोडून जातांना माझ्या मनास काय काय क्लेश होताहेत तें एका देवाला माहित असलं म्हणजे पुरे ! ”

“ भारीच बाई खोटं बोलतां तुम्ही ! ”

“ तें कसं विनोद ? ”

“ आपण होऊन का कुणी क्लेश भोगायला तयार होत असतं ? मला बरोबर तिकडे नेण्यांत विघडतंय कुठं ? ”

“ या वेळीं अभ्यासाकडे झटून लक्ष्य लाविलें पाहिजे. तुला जर नेलें तर अभ्यासाकडे माझं दुर्लक्ष्य होईल. ”

“ जळ्ळा मेला असला अभ्यास ! चुलींत कां जाईना. ” विनोदिनीनें झणकाऱ्यांत मान फिरविली.

“खुळी आहेस तूं अगदीं !” स्नेहभरानें तिच्या गालावर चापट मारून योगेंद्र म्हणाला.

याच वेळीं दुसरी एक व्यक्ति तेथें येऊन पोहोंचली. वार्तालापांत दंग झालेल्या आमच्या या प्रेमी युगुलास या गोष्टीची गंधवार्ताहि नव्हती. त्या नुक्त्याच आलेल्या सुंदरीचें वय अजमासें अठरा वर्षांचें होतें. तिच्या अंगावर कसलींहि आभरणें नव्हतीं. विधात्यानें तिला जें रूप दिलें होतें, त्यापुढें सुवर्णभूषणांची किंमत ती काय ! ती सुंदरी विधवा होती. बराच वेळ ती तेथें उभी होती. तिच्या चेहऱ्यावर विरक्तीचें चिन्ह दिसून येत होतें. कांहीं वेळानें तिच्या मानसिक यातना असह्य होऊन कीं काय, ती म्हणाली:—

“ वाहव्वाग विनयशील मुली ! ”

युवकयुवती उभयतां चपापून उभीं राहिलीं. विनोदिनी ओशाळी होऊन म्हणाली, कोण–ताईच का ? इकडे कुणीकडे ? ”

ताई म्हणाली, “ विनी ! सारी लाज तूं गुंडाळून ठेविली आहेस वाटतें ? ”

विनोदिनी वस्त्राचा पदर सांवरीत योगेंद्रापासून सरकून दूर जाऊन बसली. योगेंद्र म्हणाला, “ कमलिनी ! तिनें बहिणीलाहि लाजलें पाहिजे वाटतें ? ”

दीर्घ निःश्वास सोडून कमलिनी विनोदिनीला म्हणाली, “ विनी ! आई केव्हांपासून तुला हांका मारीत आहे. मास्तर महाशयहि दोनदां येऊन चौकशी करून गेले. ”

कांहीं न बोलतां विनोदिनी तेथून निघून गेली.

---

# द्वितीय परिच्छेद.



## परिचय.



वि

नोदिनी निघून गेल्यानंतर कमलिनी त्या संगमरवरी सोपानावर बसली. शुभ्र चंद्रकिरण, क्रीडाशील वसंतवायु, प्रस्फुटित कुसुमावली, प्रशांत सरसी वारि, शोभामयी प्रकृति—कमलिनीच्या आगमनानें जणूं अधिकच उज्वल झाली. तीच शोभा कीं, जी स्वतःच्या गुणानें दुसऱ्याच्या शोभेंत वृद्धि करते; तीच श्री कीं, जी निकटच्या पदार्थांचें श्रीसंवर्धन करते; तेंच सौदर्य, कीं जें स्वतः प्रमत्त न होऊन दुसऱ्यास प्रमत्त करावयास समर्थ होतें. कमलिनी त्या स्थानीं चिंतित, व्यथित आणि किंचित् क्रोधानें बसली. तिचा हृदयस्थ भाव कोणता कां असेना, पण तिच्या आगमनानें प्रकृति प्रफुल्ल होई एवढें मात्र खरें !

योगेंद्र पूर्वी जेथें बसला होता. तेथेंच बसला. कमलिनीहि एका पायरीवर बसली. तिच्या मनांत योगेंद्राला कांहीं सांगावयाचें होतें, पण कोण जाणे ! कां ?—तिच्यानें तें सांगवत नव्हतें. तिच्या हृदयगगनांत कोणती विद्युल्लता धांवत होती, हें कोण सांगू शकेल का ? विधवेच्या मनांत असे विचार तरी कोणते चालले होते ?

योगेंद्र बराच वेळ पावेतों दुसरीकडे तोंड करून बसला होता. थोडक्याच वेळांत सुंदरीच्या मुखावरील क्रोधाविर्भाव लुप्त झाला. योगेंद्र उठून उभा राहिला आणि म्हणाला, " कमल ! तूं इथेंच का बसणार ? "

कमलनें कांहीं एक उत्तर न देतां फक्त एकवार योगेंद्राच्या मुखाकडे नजर फिरविली. तिनें पाहिलें, योगेंद्राच्या मुखावर चिंतेचें असें मुळींच चिन्ह नव्हतें. खालीं मान घालून कमल म्हणाली, " नाहीं—बसा, आपण बरोबरच जाऊं. "

योगेंद्र खालीं बसून म्हणाला, " कमल ! मघांपासून तूं कसला बरें विचार करीत आहेस ? "

कांहीं तरी बोलावें असें कमलिनीच्या मनांत आलें. पण लगेच तिचा तो विचार पालटून ती विषण्ण स्वरांत पुटपुटली, " नाहीं–"

" तूं सांग अगर नको सांगूस. पण तुझ्या मनांत कोणते विचार चालले आहेत, हें मी पूर्ण जाणून आहें. तूं बालविधवा आहेस. आपल्या समाजांतील विधवांसारखे क्लेश दुसऱ्या कोणास भोगावे लागतात ? म्हणूनच दोन वर्षांपूर्वी तुझा पुनर्विवाह करून टाकावा असें माझ्या फार मनांत होतें. तेव्हां तर तूं हसून खेळून फार आनंदांत दिवस काढीत होतीस. त्यावेळीं तूं माझें सांगणें मनावर घेतलें नाहींस. मी सुद्धां विचार केला कीं केवळ क्लेश-निवारणार्थ विधवांच्या पुनर्विवाहाची आवश्यकता आहे; जिला वैधव्यदशेंत क्लेश होत नसतील, तिचा जरी विवाह न झाला तरी चिंता नाहीं. परंतु आतां तुझ्या मनांत ती पूर्वीची शांति आणि त्यावेळचा तो आनंद नाहीं हें मला स्पष्ट दिसून येत आहे. पण कमल ! तुझ्या क्लेशाचें कारण समजून घेण्याचा अधिकार मला नाहीं काय ?

कमलिनी स्तब्ध राहिली. एकवार तिनें योगेंद्राच्या मुखाकडे पाहिलें; आणि पुनः मान खालीं घातली. कमलिनीच्या डोळ्यांतून दोन अश्रुबिंदु पडले. योगेंद्रानें कांहीं हें पाहिलें नाहीं. योगेंद्र पुनः म्हणाला, " मला वाटतें तुझ्या मनास असह्य क्लेश होत असावेत. कसें हि असो, पण कमलिनी ! माझ्याच्यानें तुझे क्लेश नाहीं का दूर करवणार ?

कमलिनी मंद स्वरांत म्हणाली, " करवतलि–पण–तुम्ही–"

वाक्याचा अंतिम भाग योगेंद्राला कांहीं ऐकूं आला नाहीं. तो म्हणाला, " सांग तर मग कमल ! तुझ्या मनांतील दुःख मला कळूंदे. "

" कां बरं मला मरण येत नाहीं ? "

योगेंद्रानें पाहिलें. कमलिनी रडत आहे. जवळ जाऊन कातरस्वरांत तो तिला म्हणाला, कमल ! तूं अशी रडतेस कां ? "

कमलनें वर पाहिलें, तेव्हां योगेंद्राच्या चेहेऱ्यावर खऱ्या सहानुभूतीचें चिन्ह प्रगट झालें आहे, असें तिला दिसून आलें. तिच्या डोळ्यांतील अश्रु आटून गेले. एकवार मनांतील सर्व कांहीं सांगून टाकून मोकळें व्हावें असें तिला वाटलें, पण तिच्यानें तें कांहीं केल्या सांगवेचना; तिनें मान खालीं घातली. योगेंद्रानें पुनः प्रश्न केला, " सांग कमल ! काय केल्यानें तुझ्या मनांतील क्लेश दूर होतील ? "

उन्मादिनी सारखी कमलिनी उठून उभी राहिली आणि घोर मर्मभेदी स्वरांत बोलली, " हाय ! कुठून ही पापी दुराशा मनांत उद्भवली ? "

योगेंद्र विस्मयानें सुंदरीच्या चेहऱ्याकडे पाहूं लागला.

लगबगीनें कमलिनी तेथून घराकडे जावयास निघाली. योगेंद्र बराच वेळ तिच्याकडे पहात राहिला. शेवटीं दीर्घ निःश्वास टाकून तो म्हणाला, " काय कमलिनीला वेड तर नाहींना लागलें ? "

विचारमग्न होऊन योगेंद्र बराच वेळ तेथेंच बसला.

वाचक हो ! पुढील कथाभाग सांगण्यापूर्वी प्रस्तुत कथनकांतील कांहीं प्रमुख व्यक्तींशीं आपला परिचय करून दिल्यास आतां अप्रासंगिक होणार नाहीं अशी आशा आहे.

वीरग्रामांत रामनायणराय नांवाचा एक अतुल संपत्तिमान् गृहस्थ राहात होता. त्याला दोन मुली होत्या. एकीचें नांव कमलिनी व दुसरीचे नांव विनोदिनी. कमलिनी जेव्हां आठ वर्षांची झाली तेव्हां तिचा विवाह कलकत्ता येथील राधागोविंद चट्टोपाध्याय नांवाच्या एका समृद्धिशाली तरुणाबरोबर झाला. विवाहानंतर दोन वर्षांनीं राधागोविंद परलोकवासी झाला. दहाव्या वर्षी शरदिन्दुनिभानना कमलिनी दारुण वैधव्यचक्रांत पडली. राधागोविंदापाशीं विपुल धन होतें; अर्थात् त्याच्या पश्चात् कमलिनीच त्या धनाची सर्वस्वीं मालकीण होती. परंतु तिचा बापहि श्रीमंत असल्याकारणानें तिला आणखी धनाची कांहीं आवश्यकता नव्हती. रामनारायणरायास सुद्धां जामाताच्या दौलतीचा लोभ नव्हता. राधागोविंद जेव्हां मरण पावला, तेव्हां त्याच्या वडील भावाचा—राधासुंदर चट्टोपाध्यायाचा—एक वर्ष वयाचा एक मुलगा होता. हाच मुलगा पुढें मागें राधागोविंदाच्या अफाट दौलतीचा वारस होणार अशी लोकांत बोलवा होती; पण उघडपणें असें कोणी दर्शवीत नसत. या सर्व कारणांमुळें कमलिनी विधवा असून सुद्धां तिच्या घरचीं माणसें तिच्याशीं सौम्यपणानें वागत. कमलिनीच्या सासूच्या मनांत सुद्धां नातवाला सर्व संपत्ति मिळावी असें होतें; यामुळें ह्मणा किंवा कांहीं अन्य कारणामुळें ह्मणा, कमलिनीला ती मधून मधून आदरानें बोलावून आणी आणि केव्हां केव्हां नलिरत्नास ( हें नातवाचें नांव ) तिच्या बरोबर तिच्या माहेरीं वीरग्रामास पाठवी.

ज्यावेळीं कमलिनीचा विवाह झाला, त्याचवेळीं रामनारायणरायानें योगेंद्रनाथ मुखोपाध्याय नावाच्या एका मातृपितृहीन, निराश्रित पण कुलीन घराण्यांतील मुलास आपले घरीं आणून ठेविलें. त्यालाच योग्य प्रकारें शिक्षण वगैरे देऊन त्याच्याशींच पुढें विनोदिनीचें लग्न करावें असा त्याचा यांत हेतु होता. यावेळीं विनोदिनीचें वय पांच वर्षांचें व योगेंद्राचें वय बारा वर्षांचें होतें.

लहानपणापासून परस्परांच्या सहवासांत राहिल्याकारणानें हा विवाह खरोखरीच सुखकर निवडला गेला. विनोदिनी आठ वर्षांची होतांच तिचेंहि लग्न उरकून घेण्यांत आलें. वृद्ध रामनारायणराय व त्याची पत्नी ही उभयतां योगेंद्रास अगदीं जीव कीं प्राण करीत. योगेंद्र कमलिनीचा परम सुहृद आणि विनोदिनीच्या हृदयाचा स्वामी झाला. शिक्षणाच्या योगानें त्याचें मन चांगलेंच सुसंस्कृत झालें. इंग्रजी आणि संस्कृत या दोन्ही भाषांचें चांगलें अध्ययन केल्यावर केवळ हातून परोपकार घडावा या स्तुत्य हेतूनें तो कलकत्त्याच्या मेडिकल कॉलेजांत दाखल झाला.

योगेंद्र मेडिकल कॉलेजांत दाखल होण्यापूर्वीच रामनारायण रायानें आपला मानवी अवतार संपविला होता. आतां हरगोविंद बाबू नांवाचे एक सच्चरित्र आणि सुशिक्षित गृहस्थ त्याच्या साऱ्या इस्टेटीची व्यवस्था पहात होते. ते चांगले अनुभवी, प्रामाणिक आणि बालबच्चेवाले होते. योगेंद्रनाथ, कमलिनी आणि विनोदिनी यांस जर कां कांहीं पुस्तक वाचतांना चांगलेंसे समजलें नाहीं, तर हरगोविंद बाबूकडे जावून तें तीं तिन्ही समजावून घेत. जमीनदारीवर देखरेख ठेवण्याचें काम जरी मुख्यत्वेंकरून त्यांजकडे होतें, तरी मास्तर महाशय या नांवानें ते सर्वत्र प्रसिद्ध असत.

आमच्या प्रस्तुत कादंबरींत एवढींच कायतीं प्रमुख पात्रें आहेत. याशिवाय असणाऱ्या किरकोळ एक दोन पात्रांची ओळख जसजसा ओघ येईल तसतशी केली जाईल.



# तृतीय परिच्छेद.



## जाळें पसरलें !





ज्या समुद्राच्या खोल पाण्यांत मी शिरलें आहें त्याच्या तळाशीं कितीशीं रत्नें आहेत, तीं मी अवश्य पहाणार! जो लोभ आजवर हृदयांत दाबून ठेविलेला आहे, तो अवश्य सफल करणार; जी अशा-लता इतक्या दिवसांच्या सतत प्रयासानें फलद्रूप होऊं पहात आहे, तिचीं फळें मी अवश्य चाखून पहाणार; नाहीं या दुर्दमनीय आशेचा त्याग नाहीं माझ्यानें करवत,-निदान या जन्मांत तरी नाहीं. लोक निंदा करतील !-खुशाल करोत; सर्वत्रांच्या तिरस्कारास मी पात्र होईन; मेल्यानंतर मला नरकवास भोगावा लागेल; विनोदिनीला दुःखसागरांत पडावें लागेल;-पण ! काय करूं ? विनोद माझ्या मार्गांतील कांटा आहे. विनोद माझ्या इच्छेच्या आड येत आहे. ती माझी परमशत्रु आहे. तिचें कांहींहि होवो, पण मी माझी मनीषा पूर्ण करून घेणारच घेणार !"

दोन प्रहर उलटून गेले होते. अशा वेळीं एका खोलींत बसून कमलिनी वरीलप्रमाणें आपल्याशींच विचार करीत होती. इतक्यांत माधी नांवाची एक दासी हंसत हंसत तिच्या खोलींत आली. माधीच्या वयावरून असा बोध होत होता कीं, ती केव्हांच यौवनाच्या अंतिम भागास मागें सारून पुढें गेली होती. परंतु तिची उच्छृंखलता मात्र अद्यापि जशीच्या तशी होती. माधीचें वय जरी बरेंच झालें होतें, तरी जरेचें चिन्ह अद्यापिहि तिच्या चेहऱ्यावर दिसून येत नव्हतें. तिची ती लाल रंगाची साडी, हातांतील बिलोरी बांगड्या आणि तें नटणें मुरडणें पाहून तिची यौवनावस्था संपली आहे, असें कोणाला बरें वाटलें असतें ? पान खाल्ल्यामुळें लाल झालेल्या तिच्या अधरांवरील हास्य, आणि ठुमकत मुरडत चालण्याची तिची तऱ्हा पाहून माधी यौवनावस्थेंतच मोडली गेली असती. तिच्या चालचलणूकीविषयीं शेजारी पाजारी कांहीं अजाण नव्हते; पण माधी त्या सर्वांना

पुरून उरली होती. त्याच प्रमाणें ती पहिल्या प्रतीची चहाडखोर होती पण बुद्धीनें एरव्हीं ती चलाख होती. लोक म्हणत कीं, जेथें सुई शिरण्याची मारामार तेथें माधी मुसळही घुसडून द्यावयास कमी करणारी नाहीं ! वीरग्रामांत रामनारायण रायाचे घरीं ती बरेच दिवसांपासून दासी या नात्यानें काम करीत असे. पण साधारण दासीपेक्षां तेथें तिची जास्त योग्यता समजण्यांत येई. बाकी ती मेहनती, विश्वासु, हुषार पण आप्पलपोटी होती. विनोदिनी वारंवार योगेन्द्र बाबूच्या नांवें जीं पत्रें लिही तीं टपालांत टाकण्यास ती हिच्या जवळच देत असे. आणि टपालांतून विनोदिनीच्या नांवें येणारीं पत्रेंहि हीच घेऊन येत असे. अलीकडे कोण जाणें ?—कां ? कमलिनीशीं माधीचें चांगलेंच सूत जमलें होतें; माधीला खोलींत आलेली पाहून कमलिनीनें विचारिलें; "कां आज फारशी हंसतेस ?"

"पुनः पत्र आलं आहे."

"तें विनीच्या हातीं दिलेंस कीं काय ?"

"छट ! इतकी का मी खुळी आहें !"

"तर मग कुठं आहे ?"

माधीनें वस्त्राखालून पत्र काढून कमलिनीच्या हातीं दिलें. तें विनोदिनीच्या नांवचें होतें. कमलिनी तें उघडून वाचूं लागली:—

"प्रियतमे !

तुला काय झालें आहे तें मला कळत नाहीं. येथें आल्यापासून मी तुला सहा पत्रें पाठविलीं परंतु त्यां पैकीं एकाचेंहि उत्तर तुजकडून आलेलें नाहीं. त्यामुळें मी तुझ्याच काळजींत आहे. आतां जर का या पत्राचें उत्तर दोन दिवसांत तुजकडून आलें नाहीं, तर परीक्षेवर पाणी सोडून मला तिकडे यावें लागेल. काळजीनें मी अगदीं झुरूनझुरून जात आहें. माझी जर तुला दया येत असेल, तर क्षणाचाहि विलंब न करितां लौकर उत्तर पाठीव कळावें, हे आशिर्वाद.

| | |
|---|---|
| कलकत्ता<br>२२ नं. शांतसिंहाची गल्ली | सर्वस्वी तुझाच,<br>योगेंद्र." |

माधी पत्रांतील मजकूर ऐकून म्हणाली, "छान् झालं. मलाहि हवं होतं तें हेंच !"

"पण योगेंद्र आल्यावर तूं काय करशील ?"

" मी काय करीन ? ऐका तर सांगतें; कांहीं तरी युक्तिप्रयुक्तीनें परस्परांचें परस्परांविषयीं मन कलुषित करीन. म्हणजे आपोआपच त्यांची थोड्या दिवसांनंतर दृष्टादृष्टहि होणार नाहीं. "

कमलिनी थोडा वेळ कसलासा विचार करून म्हणाली, " पण त्यापासून मला काय लाभ ? "

" अगदींच कीं हो भोळ्या अहांत तुम्ही बाईसाहेब ! घड्यांत जर पाणी भरलेलें असलें, तर त्यांत आणखी पाणी जाणार कसें ? तुम्हीच सांगा, पूर्वीचें पाणी फेंकून दिल्याशिवाय दुसरें पाणी आंत भरतां येईल का ? सारांश काय, त्यांच्या परस्परांवरील प्रेमास एकदां का उतरती कळा लागली म्हणजे मग आपलं काम फत्ते ! जोंपर्यंत यांचें एकमेकांवर अढळ प्रेम असेल तोंपर्यंत कांहींहि होऊं शकणार नाहीं. प्रथमतः साखरेंत मातीच कालविली पाहिजे. "

" तूंच काय ती एकटी या कार्यांतील माझी सल्लागार ! पण कामाची घडी विसकटणार नाहीं याची मात्र चांगली खबरदारी घे. "

" तें का मला कुणी सांगितलं पाहिजे ? "

" मग या पत्राचं पुढें काय करणार ? "

काय करायचं ? पूर्वींच्या सहांची जी वाट तीच याचीही व्हावयाची; द्या इकडे मजपाशीं तें पत्र. "

कमलिनीनें माधीच्या हातीं तें पत्र दिलें. माधी पत्र घेतां घेतां म्हणाली, " विनोदिनी ताईसाहेब आतां काय करीत आहेत, हें पाहून येत्यें मी आतां. "

" चुप, चुप. तीच इकडे येत आहे वाटतं. "

इतक्यांत विनोदिनी तेथें आली. तिचा चेहरा अगदीं उदास दिसत होता. तिच्याकडे पाहून कमलिनीनें विचारलें, विनोद ! तुझा चेहरासा उदास दिसतो आज ? "

विनोदिनीचे डोळे पाण्यानें भरून आले. या प्रश्नाचें तिच्यानें कांहींच उत्तर देवलेलें नाहीं. कमलिनीनें पुनः प्रश्न केला, " योगेंद्रांचं कांहीं पत्र बित्र होतं का ? "

' नाहीं ' एवढाच शब्द उच्चारून विनोदिनी मुळुमुळु रडूं लागली. कमलिनी म्हणाली, " म्हणून इतकी चिंता ती काय करायची ? कांहीं तरी कामांत गुंतल्यामुळें झाली नसेल

त्यांना पत्र धाडायला सवड दुसरें काय ? आज नाहीं आलं, येईल उद्यां; त्याचं काय मोठेसं घेऊन बसलीस ?"

विनोदिनी वस्त्राच्या पदरानें डोळे पुशीत पुशीत म्हणाली, "मागच्या खेपेस दररोज एक, केव्हां दोन दोन सुद्धां पत्रं येत; अन् याच खेपेस कां नाहींत ?"

कमलिनी म्हणाली, परीक्षेच्या गडबडींत नसेल झाली असेल पत्र लिहायला सवड." !

विनोदिनीला रडूं कोसळलें. ती म्हणाली, "एवढीशी बोटभर चिठ्ठी लिहायला सुद्धां का सवड व्हायला हवी ?"

माधीनें हंसून खोंचक स्वरांत म्हटलें, "ताईसाहेब ! अझून तुम्ही लहान आहांत; तुम्हांला चांगलंस कळायला अद्यापि अवधि आहे. पुरुषांवर एवढा विश्वास ठेवणं कांहीं बरं नाहीं."

विनोदिनीनें विस्मयचकित होऊन विचारिलें, "म्हणजे ?"

माधी म्हणाली, "तें कलकत्ता शहर आहे शहर ताईसाहेब ! तिथं तुम्हांसारख्या कितीतरी विनोदिनी असतील. मिळाली असेल कुणीतरी नवी विनोदिनी त्यांना दुसरं काय ?"

विनोदिनीनें मंद हास्य करून म्हटलें, "भलतंच कांहींतरी ! असं होणं शक्यच नाहीं. त्यांचे हातून अशा प्रकारचें वर्तन घडणें अगदीं असंभवनीय."

"या वयांत कसलं घेऊन बसतां शक्य नी अशक्य ! तुम्ही कांहीं म्हणा ताईसाहेब ! मला तर वाटतं बाबूसाहेबांना कलकत्त्याचीच हवा लागली आहे."

कमलिनी बळेंच राग आल्यासारखें दर्शवून म्हणाली, "चहाटाळच कीं दिवसेंदिवस होताहेस तूं !"

"नाहीं बाईसाहेब ! खोटं का सांगत्यें मी यांत ?"

"पुरुषांचा नेम कुणी सांगावा असं जें तूं म्हणतेस तें कांहीं एका अर्थी खोटं नाहीं, पण योगेंद्रबाबूंच्या बाबतींत तरी तसं मला वाटत नाहीं."

क्षणभरानें विचारमग्न होऊन पुनः कमलिनी म्हणाली, "काय असेल तें असो माधी, पण योगेंद्रबाबू विनोदिनीला क्षणभरसुद्धां पूर्वी विसंबत नसत; अन् आतां पहावें तों विनीला आपलं इथंच सोडून एकटेच कलकत्त्यास गेले. सारंच बाई विलक्षण !"

" बाईसाहेब ! म्हणूनच तर मला आपलं वाटतं कीं, बाबूसाहेबांना बाहेरचा छंद लागला असावा. ताईसाहेबांनां बरोबर नेते तर त्यांचे सुखांत व्यत्यय नसता का आला? "

" कुणाच्या मनांत काय आहे हें कुणी बाई सांगावं ? "

खरें असो वा खोटें असो, शक्य वाटो वा अशक्य वाटो, विनोदिनीची छाती हें ऐकून अगदीं फाटून गेली. एकांतीं बसून या बाबतींचा पूर्ण विचार करावयाच्या उद्देशानें कांहीं कामाच्या निमित्तानें ती तेथून निघून गेली. ती गेल्यावर कमलिनी व माधी या दोघींनीं परस्परांकडे पाहून अर्थसूचक हास्य केलें.

माधीनें म्हटलें, " औषध हटकून लागू पडणार. "

कमलिनी बोलली, " तूं वाटेल तें म्हण, पण विनोदिनीचं दुःख पाहून मलाहि भारी वाईट वाटतं. "

माधी किंचित् खजील होऊन म्हणाली " मग पुढें काय करावं म्हणतां ? "

कांहीं वेळ विचारमग्न होऊन कमलिनी म्हणाली, " मी हातीं घेतललं काम सफल होणार नाहीं असं मला राहून राहून वाटतं. पण कांहीं झालं तरी आतां मी माझा संकल्प न सोडण्याचा निश्चय केलेला आहे. विनोदिनीचें जें कांहीं होणार असेल तें होवो ! अदृष्टांत जें असेल तेंच घडून येणार ! त्याची मला परवा नाही. माझा फार दिवसांचा हेतु पुरा झाला कीं झालें ! "

इतक्यांत घरांत एकच गडबड उडाली. एका दासीनें घाबऱ्या घाबऱ्या येऊन सांगितलें, " ताईसाहेबांस मूर्च्छा आली आहे. "

हे ऐकून माधी व कमलिनी घरांत धांवल्या.



# चतुर्थ परिच्छेद.



## स्त्रीदेवता.

—:०:—



संध्यासमयीं कलकत्ता राजधानीनें विचित्र शोभा धारण केली होती. रुंद व प्रशस्त राजमार्गांवर विजेचे दिवे लखलखत होते. डॉग-कार्ट, व्हिक्टोरिया, शिग्राम, सायकल वगैरे वाहनांवरून गुल-हौशी लोक सहल करावयास लोटले होते. मजूर वर्ग गिरण्यांतून नुक्ताच बाहेर पडला होता. ऑफिसांतून सुटलेले कारकून कोणी शाकभाजी, कोणी मासे, कोणी कांहीं तर कोणी रिक्त हस्तेंच परत घराकडे यावयास लोटले होते. चिना बाजारांतील दुकानदार किल्ल्यांचा जुडगा हातांत घेऊन रोजच्या देवघेवींचा–नफ्या तोटयाचा हिशोब करीत करीत घराकडे चालले होते. ' चना गरमा-गरम ' ' लेव ठंडा आइसक्रीम, सोडा, लिंबु, बरफ ' वगैरे फेरीवाल्यांच्या ललकारांनीं सारे रस्ते अगदीं गजबजून गेले होते. याप्रमाणें कोणी चिंताग्रस्त, उदासी तर कोणी आनंदी व संतोषी दिसत होते.

या वेळीं गोलदीघीच्या जवळील रस्त्यावर दोघेजण बोलत उभे होते. ही वेळ जरी संध्याकाळची होती तरी अजूनहि उष्मा बराच होत असल्याकारणानें त्यांचे चेहऱ्यावर घर्मबिंदु चकाकत होते. या दोघांजणांपैकीं एक आपला पूर्वपरिचित योगेंद्र व दुसरा त्याचा सहाध्यायी सुरेश होता. बोलतां बोलतां योगेंद्र बोलूं लागलाः—

" ही किती आश्चर्याची गोष्ट आहे सुरेश ! येथें आल्यावर विनोदिनीला मी सहा सात पत्रें पाठविलीं तथापि त्यांपैकीं एकाचेंहि उत्तर मला मिळालें नाहीं. "

गंभीर स्वरांत सुरेशनें म्हटलें, " यांत आश्चर्य तें कसलें ? "

" म्हणजे ? " योगेंद्र म्हणाला, पूर्वी प्रत्येक दिवशीं जी मला एक तरी पत्र धाडी व एखादे दिवशीं जर का चुकून कधीं तिला माझें पत्र मिळालें नाहीं तर तें एकदां हातीं

येईपर्यंत जिला धीर धरवत नसे, तिनें दोन आठवड्यांतून मला एक सुद्धां पत्र पाठवूं नये हें आश्चर्यकारक नव्हे काय ? ”

सुरेश हंसून म्हणाला, “ कदाचित् तिला तुझीं पत्रें मिळालीं नसतील. ”

“ तसं होणं असंभवित आहे. ”

“यदाकदाचित् तिला तीं पावलींहि असतील, पण आळसानें तिनें उत्तर पाठविलें नसेल.”

तिरस्कारव्यंजक स्वरांत योगेंद्र म्हणाला, “ हें काय असें वेड्यासारखें भकतोस ? विनोदिनीला माझीं पत्रें मिळूनसुद्धां तिनें उत्तर पाठविणें आळसावारी घालविलें अशी कल्पनाहि करणें चुकीचें होईल. ”

सुरेशनें हंसत हंसत म्हटलें, “ तूं तर पक्का बाइलवेडा दिसतोस. ”

कांहींशा अभिमानानें योगेंद्र म्हणाला, “ विनोदिनीसारख्या गुणवती स्त्रीरत्नाचा लाभ होणें कांहीं सर्वांच्या नशिबीं नसतें. मग तुझ्यासारख्या शेंकडोंजणांनीं जरी बाईलवेडा म्हणून हिणविलें तरी त्याची पर्वा करतो कोण ? ”

“ ईश्वर करो आणि तसा प्रसंग माझ्यावर न येवो म्हणजे झालें ! बाबारे तुम्ही लोक स्त्रियांस देवता असें मानीत असतां; तशी आमची कांहीं गोष्ट नाहीं. परंतु माझी तर पूर्ण खात्री आहे कीं, संसारांत पापाची जर कोणती खाण असेल तर ती एक स्त्रीजात !”

गंभीर भावानें योगेंद्र म्हणाला, “ दुसऱ्या कोणत्याहि बाबतींत तुझा माझा मतभेद होणें शक्य नाहीं, परंतु एवढ्या बाबतींत मात्र स्त्रीजातिविषयक तुझ्या अनुदार कल्पना व कोते विचार मला अगदीं पसंत नाहींत. तूं कांहींहि म्हटलेंस तरी विनोदिनीच्या काळजीनें मला खाणें पिणेंहि कडू विषासारखें वाटतें. माझें मुळीं कशावर लक्ष्यच लागेनासें झालें आहे. परीक्षासुद्धां जवळ येत आहे, पण परीक्षा देण्याइतकें मनःस्वास्थ्य सध्यां माझ्या आंगीं आहे कोठें ? मी उद्यांच तिकडे जाईन म्हणतों. ”

“ जाऊन आणखी तें काय पहाणार ? विनोदिनी चांगली हंसून खेळून खुशाल आहे हेंच कीं नाहीं ? ”

“ तें दिसेल काय तें आपोआप पुढें. ”

सुरेश मनांतल्या मनांत म्हणाला, “ या दुष्ट स्त्रियाच सर्व अनर्थांचें मूळ आहेत. यांच्यापाशीं असा कांहीं अद्भुत मोहमंत्र आहे कीं, मोठमोठाले योगिवर सुद्धां आपल्या कर्तव्यापासून च्युत होऊन यांच्या पाशांत गुरफटून जातात. ”

योगेंद्र थोड्या वेळानें पुनः किंचित् हंसून म्हणाला, " सुरेश ! मला वाटतें तुझ्या बुद्धीला भ्रम झालेला आहे."

" तसेंहि म्हण वाटेल तर. पण योगेंद्र ! या भयंकर स्त्रीजातीला तूं अद्यापि बरोबर ओळखत नाहींस. तूं तेथें गेल्यावर जेव्हां विनोदिनीस पत्र न पाठविण्याचें कारण विचारशील, तेव्हां ती हेंच सांगेल कीं, अमक्यातमक्याच्या मुलासाठीं मी एकादी मोजाची जोडी, कुडतें अगर टोपडें शिवीत होतें अगर एखाद्या शूर्पणखेचें नाटक वाचण्यांत अगदीं गढून गेले होतें किंवा श्यामाच्या आईचा नुटोच्या ( संपूर्ण नांव कदाचित् नटविहारी असेल ) आतेशीं चाललेला तंटा ऐकतां ऐकतां कानही किटले मग पत्र लिहिणार केव्हां ! बाबारे, स्त्रीजातीला असलीं हजार कारणें दाखवावयाला कोणी सांगितलें का पाहिजे ? म्हणून म्हणतों, स्त्रियांवर एवढा विश्वास ठेवणें बरें नाहीं."

कांहींसा चिडून योगेंद्र म्हणाला, " छट, भलतेंच कांहीं तरी !"

सुरेश म्हणाला " बरें तर बुवा, राहूं दे तें आतां. मला जरा काम आहे तेव्हां या विषयावर बोलूं आपण केव्हांतरी पुढें. पण तूं खरोखरीच का उद्यां घरीं जाणार ?"

योगेंद्र म्हणाला, " हो, बेत केला आहे खरा असा."

" जशी तुझी मर्जी ! पण विनाकारण अधीर होऊन एक वर्ष मात्र तूं अशा रीतीनें फुकट घालवीत आहेस हें सांगितल्याशिवाय माझ्यानें रहावत नाहीं." इतकें बोलून सुरेश तेथून निघून गेला. योगेंद्र त्या ठिकाणीं एकटाच राहिला. दारुण चिंतेमुळें सहल करतांना वाटणाऱ्या उल्हासाचें अल्पसुद्धां चिन्ह त्याच्या मुद्रेवर दिसत नव्हतें. तो आत्मगत म्हणाला, " सुरेश म्हणतो त्याप्रमाणें का खरोखरी विनोद असेल ? कां बरें ती मला पत्रें धाडीत नाहीं ? ती आजारीका असेल, हो–संभवित दिसतें " याप्रमाणें विचार करीत करीत योगेंद्र परत घराकडे लोटला. परत येतां येतां त्यानें एका वृद्धेस रडत रडत रस्त्यानें जातांना पाहिलें. तें पाहून कोमलहृदयी योगेंद्राला मनस्वी वाईट वाटलें. त्याच्या काळजाचें पाणीच पाणी झालें. त्यानें प्रश्न केला, " आजीबाई ! काय झालें हो ! अशा रडतां कां तुम्ही ?"

हा प्रश्न ऐकून म्हातारीस जास्तच रडूं कोसळलें. रडत रडत कंपित स्वरांत ती सांगूं लागली, " बाबूसाहेब ! माझं नशीबच मेलं फुटकं हो !"

आतां तर ती पूर्वींपेक्षांहि जास्त मोठ्यानें रडूं लागली; व हें तिचें रडें ऐकून आजुबाजूचे लोकहि त्याठिकाणीं जमूं लागले. म्हातारी कर्मकथा सांगूं लागली, "एक शिवाय करून कुटुंबांतील सार्‍यांनां दुष्ट काळानें खाऊन टाकिलं माझें घर पूर्वी मुलांबाळांनीं गजबजलेलं होतं. हाय! हाय! निर्दय यमाला तें बघवलं नाहीं. क्रमाक्रमानें त्यानें सर्वांना नेलं अन् मी कपाळकरंटी मात्र तें पाह्यला जिवंत राहिल्यें आहें."

कातर स्वरांत वृद्धेनें सांगितलेली कर्मकहाणी ऐकून आणि तिचा मलीन वेष पाहून योगेंद्राचें हृदय द्रवलें. त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. वृद्धा पुढें म्हणाली, "एक नात आहे. काळाची नजर आतां तिच्यावरहि फिरली आहे."

इतकें बोलून शोकविव्हल होऊन ती म्हातारी मटकन् खालींच बसली. क्रमाक्रमानें लोकांची गर्दीहि होऊं लागली. लोकांनां काय? नसत्या उठाठेवी हव्यात–दुसर्‍यांची कुचेष्टा करायला हवी! ज्यांना धंदा रोजगार हवा, पैसा हवा, ऐषआराम भोगण्यास हवा आणि नानाप्रकारचे रंगढंग करावयास हवेत त्यांनां कलकत्ता शहर!! तें म्हणजे स्वार्थपरायणता शिकण्याचें केंद्रस्थान, कुनीतीची खाण आणि स्वर्गीय मनोवृत्तींची वध्यभूमि!!! असो; त्या ठिकाणीं जमा झालेले सर्व लोक हें दृश्य पाहूं लागले.

एकजण बोलला, "चला बाबानों! जाऊं या आपण; आहे कोणाला फुरसत दुसर्‍याचें पहावयाला." दुसरा बोलला, "अरे, कसलें घेऊन बसलांत; सगळें ढोंग आहे ढोंग हें!" तिसर्‍यानें आपलें घोडें पुढें ढकलून म्हटलें, "अहो, भीक मागावयाची ही एक नवीन शक्कल आहे शक्कल दुसरें काय?" इतक्यांत नुकत्याच तेथें आलेल्या एकजणानें दुसर्‍या एका इसमास विचारलें, "अहो, झालें आहे काय इथें ही एवढी गर्दी जमली ती?" या नवशिक्या इसमास जेव्हां त्या दुसर्‍या इसमाकडून साद्यंत हकीकत समजली तेव्हां तो म्हणाला, "उंः एवढेंच ना! मी म्हटलें एवढी गर्दी झाली तेव्हां काय झालें नी काय नाहीं."

योगेंद्रानें विचारिलें, "आजीबाई! काय झालें आहेहो आपल्या नातीला?"

"ती फार आजारी आहे–अगदीं आसन्नमरण स्थितींत आहे. बापरे! मी पुढें करूं तरी काय?"

" तुम्ही रहातां कोठें ? "

" बागबाजारांत. "

" येथें कोठें चालला होतां ? "

" मी ऐकलं होतं कीं, या बाजूला एक धर्मार्थ दवाखाना आहे. तिथं गोरगरिबांस फुकट औषधें देतात. म्हणून मी जीव तोंडीत कशीबशी आल्यें; पण बाबुसाहेब! सगळं उपड्या घड्यावर पाणीच हो! कुणीहि माझ्या दुःखाची गोष्ट ऐकून घेतली नाहीं. अरेरे! अद्यापि औषधाचा एखादा थेंबहि पोरीच्या तोंडांत गेला नाहीं हो ! "

वृद्धा मोठ्यानें रडूं लागली. रोगी बरोबर नसल्याकारणानें औषध कसें द्यावें याचा योगेंद्रास मोठा विचार पडला. इतक्यांत त्या रस्त्यानें एक खालीं गाडी जात असलेली पाहून त्यानें गाडीवानास गाडी थांबविण्यास सांगून म्हटलें, " बसा या गाडींत. मीहि तुमच्या बरोबर येतों. मी स्वतः डॉक्टरी जाणतों. तुम्हीं अगदीं काळजी करूं नका. "

वृद्धा उठून म्हणाली, " बाबूसाहेब! देव तुम्हांला उदंड आयुष्य देवो! पण गाडी-भाड्यापुरते पैसेहि मजपाशीं नाहींत हो ! "

योगेंद्र म्हणला, " त्याची सोडा तुम्ही काळजी अगदीं. "

वृद्धेच्या हातीं स्वर्ग आला. अनंत आशीर्वाद देत ती गाडींत जाऊन बसली. योगेंद्रहि त्याच गाडींत बसून बागबाजाराकडे निघाला.



# पंचम परिच्छेद.



## आजार.





दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं योगेंद्र आपल्या बिऱ्हाडीं परत आला. विनोदिनीच्या काळजीनें व रात्रभरच्या अनाहारामुळें, श्रमामुळें आणि जाग्रणामुळें त्याचें शरीर आणि मन दोन्ही अस्वस्थ झालीं. योगेंद्राच्या निःसीम परिश्रमानें रोगी वांचला. रोग्याच्या पथ्य-पाण्याचा नीट बंदोबस्त करून आणि निर्वाहासाठीं थोडेंसें द्रव्य देऊन योगेंद्र गाडी करून परत आपल्या बिऱ्हाडीं परतला. गाडींतून उतरून घरांत येई-पर्यंत योगेंद्रास अगदीं पुरेपुरेसें झालें. आज आपण हटकून आजारी पडणार असें त्याचें त्यास वाटूं लागलें. तसाच मोठ्या प्रयासानें बिछान्यावर जाऊन तो झोंपीं गेला. अशा स्थितींत किती काळ लोटला याचें त्याला भान राहिलें नाहीं. त्याच्या बिऱ्हाडीं एक आचारी व एक गडी असे दोन नोकर होते. त्यांस वाटलें कीं, आपला धनी गाढ झोंपेंत आहे, तेव्हां त्याची झोंपमोड होऊं नये म्हणून त्यास उठविण्याच्या भरीस कोणी पडलें नाहीं.

संध्याकाळच्या चार वाजण्याच्या सुमारास योगेंद्र थोडासा शुद्धीवर आला. तेव्हां आपणांस ज्वर आलेला आहे असें त्यांस दिसून आलें. मानसिक उद्वेग आणि शारीरिक श्रम ज्वर यावयास कारण झालीं असावींत असें वाटून तो पुनः झोंपला. इतक्यांत गड्यानें येऊन हात लावून पाहिलें, तों त्यास सडकून ताप भरला आहेसें त्याला आढळून आलें. तेव्हां त्यानें जावून आचाऱ्यास हें वर्तमान सांगितलें. स्वतः उत्तम नाडीपरीक्षक आहोंत असें हा आचारी अशिक्षित व गांवढळ मंडळींत स्वतःच टेंभा मिरवीत असे. कसेंहि असो पण केव्हां केव्हां हे विद्वानशिरोमणि राव भाजींत मीठ घालावयास विसरत हें मात्र खात्रीपूर्वक आम्हांस ठाऊक आहे. ठाकुर महाशय या नांवानें हे फार करून प्रसिद्ध असत. असो.

साधुचरणाला ठाकुर महाशय म्हणाला, " बाबूसाहेबांनां वायूचा कोप झालेला आहे. आज त्यांनीं निराहारच राहिलें पाहिजे. उद्यांचें मग पहातां येईल. "

गडी म्हणाला, " मी बाबूसाहेबांस आजारीपणाविषयीं मघां विचारलें. त्यावर ते कांहीं बोलले नाहींत. मला वाटतें त्याचें एरव्हींच अंग तापलें असेल. "

ठाकुरजी म्हणाला, " असेलहि कदाचित् तसें. "

याप्रमाणें योगेंद्राचे दोन्ही नोकर आपसांत त्यांच्या आजाराची मीमांसा करीत होते. योगेंद्रनाथास झोंप—नव्हे झांपड लागली. त्याला नानाप्रकारचीं भयंकर चमत्कारिक स्वप्नें पडूं लागलीं. दोन प्रहर रात्र लोटल्यावर जेव्हां तो जागा झाला, तेव्हांच अशा प्रकारच्या स्वप्नांनीं त्याचा पिच्छा सोडला. ज्वर अद्यापिहि कांहीं कमी झाला नव्हता. ज्वरानें आपणांस बरेंच अशक्त व क्षीण केलें आहे हें योगेंद्र समजून चुकला. त्याला चक्कर येऊं लागली. डोकें अतिशय दुखूं लागलें. पृथ्वी गरगर फिरते आहे चोहोंकडे गाढ अंधार आहे असें त्यास वाटूं लागलें. आपणांस आलेला हा ज्वर साधारणपैकीं नाहीं हें तो समजला.

त्यानें हांक मारली, " साधुचरण ! "

दुसऱ्या खोलींत झोंपलेल्या साधुचरणाला ती क्षीण स्वरांत मारलेली अस्पष्ट हांक कांहीं ऐकूं गेली नाहीं. थोड्या वेळानें पुनः योगेंद्रानें हांक मारिली—पुनःहि उत्तर मिळालें नाहीं. तिसऱ्या खेपेस मात्र डोळे चोळीत चोळीत साधुचरणानें येऊन विचारिलें, " मला का हाक मारली आपण बाबूसाहेब ! "

आपण कशासाठीं साधुचरणाला हाक मारली तें योगेंद्र विसरला. तो स्तब्ध राहिला. साधुचरणानें पुनः विचारिलें, " काय सांगतां आपण मला बाबुसाहेब ! "

योगेंद्र डोळे मिटल्या मिटल्या अर्धवट शुद्धींत म्हणाला, " अरे, एकवार विनोदिनीला हांक मार पाहूं. ती कोठें आहे ? "

विनोदिनी कोण हें साधुचरणाला कांहीं ठाऊक नव्हतें. तो स्वतःशींच विचार करूं लागला, हें काय ? बाबूसाहेबांनां भुत तर नाहींना लागलें ? "

भयभीत होऊन त्यानें म्हटलें, " आपण काय म्हणतां तें नाहीं माझ्या ध्यानांत येत. "

योगेंद्र डोळे मिटून मानेला हिसडा देत म्हणाला, " अरे सुरेश बाबू—"

साधुचरणाला हेंहि समजलें नाहीं. पुनः धन्याला विचारण्यासहि त्याचें मन धजेना. तो ठाकुर महाशयाची सल्ला विचारावयास गेला. ठाकुर महाशय या वेळीं अगदीं गाढ निद्रेंत असून त्याचें नासिकायंत्र फार जोरानें चाललें होतें. वाघाच्या डुरकावणीलाहि कोणी इतका भ्याला नसता. मोठ्या मुष्कीलीनें या आधुनिक कुंभकर्णास जागें केल्यावर साधुचरणानें त्यास धन्याची हकीकत सांगितली. तेव्हां ठाकुर म्हणाला, " बाबूजींची चालचलणूक बिघडली असेल ! "

" कशावरून असें तुम्हांला वाटतें ? बाबूजी कांहीं तशा प्रकारचे मनुष्य नाहींत. "

ठाकुरजी हंसून म्हणाला, "अगदींच कीरे उल्लू तूं ! कोण मनुष्य कसा आहे हें थोडें दुसऱ्याला कळतें ? बाबूजींचा अलिकडे कोठें जीव लागत नाहीं हें नाहीं का तूं पहात ? परवांच्या दिवशीं जे गेले होते ते सबंध एक रात्र उलटून गेल्यावर दुपारीं आणि अशा स्थितींत घरीं येतात. यावरून बाबूजींनां बाहेरचा छंद लागला असावा असें नाहीं का अनुमान होत ? आणि तापाच्या भरांत तूंच म्हणतोस कीं, एका स्त्रीचें नांव घेऊन बडबडत होते. मग तेंच असावें कारण ! मी अशीं पुष्कळ उदाहरणें पाहिलीं आहेत. "

साधुचरण विस्मयचकित होऊन म्हणतो, " मग याला उपाय ? "

" तुझं डोचकं ! "

याप्रमाणें हे दोघे पंडित तर्कवितर्क करीत बसले असतां केव्हांच उजाडलें. इतक्यांत सुरेशानें तेथें येऊन योगेंद्राविषयीं चौकशी केली. तेव्हां साधुचरणानें सांगितलें:—

" बाबुसाहेबांस ताप आलेला आहे. "

" काय ताप ? "

" होय. "

आणखी कांहीं न बोलतां सुरेश योगेंद्राच्या खोलींत शिरला. त्यानें त्याच्या अंगाला हात लावून वगैरे तपासून पाहिलें. तेव्हां तो फारच चिंतातुर झाला. योगेंद्राला आलेला ज्वर सामान्य प्रकारचा नव्हता. क्षीणस्वरांत योगेंद्र म्हणाला, "सुरेश ! तुझी काय अटकळ आहे ? ज्वर कांहीं साधारण दिसत नाहीं. मला वाटतें विनोदिनीची व माझी भेट कांहीं या जन्मीं आतां होत नाहीं. गेल्या रात्रीं मी स्वप्नांत पाहिलें कीं, विनोदिनी आकाशाच्या

मध्यभागीं नक्षत्रमंडळानें परिवेष्टित होऊन बसलेली आहे व मी मोठमोठ्यानें ' विनोद ! ' मला सोडून तूं कोठें चाललीस ? अशा हांका तिला मारीत आहें. पुष्कळ वेळानंतर विनोदिनीनें माझ्याकडे नजर फिरविली. ती म्हणाली, ' प्रथमतःच कां नाहीं मला सांगितलें ? पहिल्यानदांच का समजलां नाहीं ? म्हणून तर मीही इथं आलें. आतां इथून कांहीं परत येतां यावयाचें नाहीं. आतां या जन्मांत कांहीं आपली माझी भेट होणें नाहीं. ' हें ऐकून मी वेड्यासारखा रडूं लागलों. पुनः विनोदिनी म्हणाली, ' आतां रडून काय होणार ? येथें आपणांस येतां येईल तर या. ' माझ्यानें कांहीं याप्रमाणें झालें नाहीं, तेव्हां विनोदिनी म्हणाली, " थांबा. मीच येतें आपणांकडे. मला कांहीं एकदोन गोष्टी आपणांला विचारावयाच्या आहेत. " इतकें बोलून ती माझ्याजवळ आली. मी हात वर करून तिला धरावयास पाहूं लागलों; तेव्हां ती म्हणाली, ' आतां तुम्हांला मला धरतां यावयाचें नाहीं. ' तरीहि मी तिला धरण्यासाठीं पुढें पुढें जावूं लागलों. पण जों जों मी पुढें जावूं लागलों तों तों ती मागें मागें सरकूं लागली. जातां जातां आम्ही एका दुस्तर सागरापाशीं येऊन पोहचलों, मला वाटलें विनोदिनी आतां कोठें पळणार ! पण काय चमत्कार ! ती बेधडक पाण्यावरून चालूं लागली. मला अभाग्याला मात्र जातां येईना; मी किनाऱ्यावर बसून रडत रडत तिला विनवूं लागलों. विनोद हातानें खुणावून मला ' आतां परत लोटा. असें काय खुळ्यासारखें करतां ? ' असें सांगूं लागली. शेवटीं ती समुद्राच्या पार दुसऱ्या टोंकास जावून पोंचली. तरीहि अद्यापि ती थोडथोडी दिसत होती. ती तेथेंहि स्थिर न राहतां चालूं लागली आणि हातानें मला परत लोटण्याविषयीं खुणावूं लागली. यानंतर ती एवढ्या दूर निघून गेली कीं, अगदीं दिसेनाशी झाली. हा प्रकार पाहून मी तर अगदीं घाबरलों इतक्यांत तूं आलास तेव्हां कोठें मी जागा झालों आणि पहातों तों हें सारें स्वप्न ! सुरेश ! हें स्वप्न अशुभ का आहे ? भाई ! कायरे होणार आतां ? "

सुरेशनें पाहिलें, विनोदिनीच्या काळजीमुळें योगेंद्राची अशी अवस्था झालेली आहे; आणि अशीच जर तो काळजी करीत राहिला तर प्रसंग मोठा बिकट आहे.

" योगेंद्र ! उगीच तर्कवितर्क बांधून काळजी करीत राहूं नकोस; विनोदिनीला मी इकडे येण्याविषयीं लिहितों मग तर झालें ?"

विनोदिनीच्या काळजीमुळें योगेंद्राच्या शरीरावर वाईट परिणाम झालेला आहे हें सुरेशच्या तेव्हांच लक्ष्यांत आलें. तेव्हां तो पुढें म्हणाला, " मी तिच्या नांवें पत्र रजिस्टर करून पाठवितों. म्हणजे विनोदिनी कुशल असल्यास पत्र पावतांच आल्याशिवाय रहाणार नाहीं. "

" आणि जर कां तिच्या प्रकृतीस स्वास्थ्य नसलें तर ? "

" तरीहि तुझ्या आजारीपणाची बातमी समजतांच तिकडून कोणी ना कोणी तरी येईलच. "

" यदाकदाचित् विनोदिनी बरी असूनसुद्धां न आली तर ?"

" तर, तर काय ? विनोदिनी पापिणी आहे असें समज आणि इतःपर तिचें नांवहि काढूं नकोस म्हणजे झालें. "

डोळे मिटल्यामिटल्या योगेंद्र म्हणाला, "विनोदिनी स्वर्गीय देवता आहे कीं राक्षसीण आहे हें परवांच आपोआप दिसेल. "

सुरेशनें पत्र लिहून काढिलें. पत्रावरून विनोदिनी खास आल्याशिवाय रहाणार नाहीं असें त्यास खात्रीपूर्वक वाटूं लागलें.

साधुचरण हुकुमाप्रमाणें तें पत्र रजिस्टर करून पावती घेऊन आला. ती पावती योगेंद्राला दाखवून सुरेश म्हणाला, " ही पहा पावती. उगीच आतां चिंता करूं नकोस. परवां विनोदिनीला येथेंच तूं पहाशील. तेव्हां आपलें मन शांत ठेव मी तुझ्या औषधपाण्याची व्यवस्था ठेवितों. "

नंतर सुरेशनें जाऊन कॉलेजच्या अध्यापकांस योगेंद्राच्या आजारीपणाची हकीगत कळविली. नंतर डॉक्टरास घेऊन लगेच तो योगेंद्राच्या बिऱ्हाडीं आला. सुरेश सर्व काम सोडून आपल्या मित्राच्या बिछान्याजवळ बसून त्याची शुश्रूषा करूं लागला.



# षष्ठ परिच्छेद.



## कुपथ्य.



म्हणतां म्हणतां सहा दिवस निघून गेले. योगेंद्र अद्यापि आजारीच होता. त्या दिवशीं ऊष्मा मी म्हणत होता. सुमारें तीन वाजण्याची वेळ. योगेंद्र आपले खोलींत बिछान्यावर तळमळत पडला होता. त्यानें डोळे घट्ट मिटून धरले होते. त्याच्याजवळच एक जगन्मोहिनी सुंदरी बसून त्याची शुश्रूषा करीत होती. तिच्याजवळच दुसरी एक स्त्री बसली होती. तीच ती माधी. खोलींत आणखी दुसरें कोणीहि नव्हतें. जवळच्या दुसऱ्या खोलींत सुरेश एका आरामखुर्चीवरच झोंपीं गेला होता. त्याच खोलींत सुरेशच्या जवळील एका खुर्चीवर एक बालक बसला होता. त्याचें नांव नीलरतन. आपल्या पूर्वपरिचित कमलिनीचा तो पुतण्या.

दरवाजाजवळच एक पालखी होती. भोई लोक थकून भागून गेल्यामुळें पडवींतच झोंपी गेले होते. एकच काय तो त्यांपैकीं तंबाखू ओढीत बसला होता.

योगेंद्रानें एकवार डोळे उघडून पाहिलें. कमलिनीच्या परमरमणीय मुखकमलाचें त्याच्या नेत्रांशीं सम्मीलन झालें. कमलनें हांक मारिली, " योगिन् ! "

योगेंद्रानें पुनः आपले नेत्र मिटून धरले होते. कदाचित् कमलिनीची हांकहि त्याला ऐकूं आली नसेल. पुनः कांहीं वेळानें योगेंद्र डोळे उघडून तिच्याकडे पहात पहात म्हणाला, " कमल ! तूंच का आहेस ? "

कमलिनी म्हणाली, " होय, आपल्या आजारीपणाची बातमी ऐकून निघून आल्यें. "

" आणि विनोदिनी ? "

" ती खुशाल आहे. "

" माझें पत्र काय झालें ? "

माधीनें कमलिनीला हळूच चिमटा काढिला. कमलिनी म्हणाली, " आपलं पत्र विनोदिनीला दाखविलं नाहीं. ती गरोदर असल्या कारणानें ही बातमी तिच्या कानांवर घालविणें इष्ट वाटलें नाहीं. "

एवढ्या शारीरिक यातना होत असतांहि योगेंद्राला थोडें हंसूं आलें. खरोखर माये ! तुझा प्रभाव अजब आहे. योगेंद्र म्हणाला, "ठीक केलेंस."

कमलिनी हळुहळू म्हणाली, "तें पत्र माझ्याच हातीं पडलं. मी पाहिलं अक्षर कुणा दुसऱ्याचंच आहे. मी तें वाचलं. चिंतेमुळं माझा सबंध रात्रींत डोळ्यास डोळा कसा तो अगदीं लागला नाहीं; अन् केव्हां एकदां उजाडतं असं झालं. उजाडतांच पुतण्याविषयीं मला कांहीं वाईट स्वप्न पडलं आहे तेव्हां मी त्याला पाहून येतं असं सांगून माधीला बरोबर घेऊन निघून आल्यं."

वाचकहो, कमलिनीचें सासरहि कलकत्त्यास होतें हें आम्ही पूर्वीच सांगितलेलें आहे. ती याच निमित्तानें कलकत्यास येत जात असे. यावेळींसुद्धां ती याच निमित्तानें कलकत्त्यास आली होती.

योगेंद्र म्हणाला, "खरोखर कमल ! तुझ्या गुणांनां सीमा नाहीं. मी तुझा अत्यंत ऋणी आहें. हें ऋण माझ्यानें कसें फिटणार कोण जाणे !"

कमलिनी म्हणाली, "योगेंद्र ! आपल्यासाठीं माझ्या जिवास किती काळजी लागली आहे तें शब्दांनीं व्यक्त करतां येण्याजोगं नाहीं. परमेश्वर करो आणि आपलं हें दुखणं लौकर निघून जावो हीच काय ती एक माझी इच्छा !"

कमलिनीचे डोळे आसवांनीं भरून आले. योगेंद्राचें कांहीं तिकडे लक्ष्य नव्हतें. श्रम असह्य झाल्यामुळें पुनः त्यानें डोळे मिटले होते.

कमलिनी त्याच्या मस्तकावर हात फिरवून प्रेमपरिपूर्ण तृषित दृष्टीनें त्याच्या मुखकमलाकडे पाहूं लागली. ती आत्मगत विचार करूं लागली कीं, 'शरीर रक्त मांसाचें बनलेलें आहे. हृदय—मानवी हृदय हीन वृत्तींनीं भरलेलें आहे. तर मग काय केल्यानें मी माझा लोभ आवरूं शकेन ? काय या जगांत आजपर्यंत कोणी स्त्रीनें आपला लोभ आंवरून धरला असेल का ? जर असेल तर ती एक देवीच असें म्हटलें पाहिजे. परंतु मला तें देवत्व नको आहे. माझ्या मनांतील राक्षसी आकांक्षेचें निवारण करणें माझ्या शक्तिपलीकडचें आहे. लोक मला वाटेल तर पिशाच्चिनी म्हणोत—या पापामुळें अनंतकालपर्यंत मला नरकवास भोगावा लागो—तरीहि हा लोभ माझ्यानें सोडवणार नाहीं. यामुळें विनोदिनीचा सर्व नाश होईल हें खरें ! पण या जगतांत स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठीं दुसऱ्याचा सर्वनाश आजपर्यंत थोड्याथोडक्या जणांनीं का केला आहे ? सुखासाठीं मी माझ्या बहिणीचा सर्व नाश केल्यास त्यांत वावगें तें काय ?"

इतक्यांत सुरेश तेथें येऊन म्हणाला, "औषध देण्याची वेळ झाली आहे. आतां औषधाचा एक भाग द्या."

कमलिनी औषध देण्याच्या तजविजीस लागली.

---

# सप्तम परिच्छेद.



## नूतन व्याधि.






डॉक्टराच्या अविश्रांत परिश्रमामुळें आणि सुरेश व कमलिनीच्या शुश्रूषेमुळें योगेंद्राची रोगापासून मुक्तता झाली. एक महिन्यानंतर आज फिरून आपण त्याची मुलाखत घेऊंया. या एक महिन्यांत योगेंद्राचा चेहरा इतका कांहीं पालटला होता कीं, हाच तो पूर्वीचा योगेंद्र असें कोणालाहि वाटलें नसतें. त्याचें पूर्वीचें तें तेज, तें रूप सारें नष्ट झालें.

आज योगेंद्र एकटाच बसला होता. इतक्यांत माधी तेथें आली. योगेंद्रानें माधीला पाहून हंसत हंसत म्हटलें, " काय खबर आहे ? "

" बाईसाहेब आतां आपल्याकडे यावयाच्या आहेत म्हणून सांगायला आल्यें आहें. "

" खरोखर तुझ्या बाईसाहेबांच्या—कमलिनीच्या—गुणांस सीमा नाहीं. परंतु विनोदिनीला माझेबद्दल आहे का कांहीं काळजी ? "

माधीनें हंसून म्हटलें, " म्हणजे त्यांनाहि असलीच पाहिजे. "

" पण आजपर्यंतच्या अनुभवावरून तरी तसें कांहीं दिसत नाहीं. "

" आपल्या या संदिग्ध भाषणाचा अर्थ तरी काय बाबूसाहेब ? "

" विनोदिनीनें एका शब्दानेंसुद्धां माझी विचारपूस केलेली नाहीं. बरें तें एक असो पण आपण गरोदर असल्याबद्दलसुद्धां मला कळविलें नाहीं. "

हें ऐकून जणूं काय आपणावर आकाशच कोसळून पडलें असें दाखवून विस्मयचकित होऊन म्हणाली, " गरोदर आहेत म्हणून कुणी आपणाला सांगितलं ? "

योगेंद्र म्हणाला, " कोणी म्हणजे ? कमलिनीनें. "

पहिल्याप्रमाणेंच दृष्टि स्थिर करून माधी म्हणाली, " मोठेंच आश्चर्य म्हणायचं तर मग हें ! घरांतील प्रत्येक गोष्ट माझ्यापासून अजाण नसते. असें असतां ताईसाहेब गरोदर आहेत तें मला न कळणें ही मोठ्या नवलाची गोष्ट आहे. "

" म्हणजे ? "

" ताईसाहेब गरोदर नाहींत हें मला पक्कें माहित आहे. येण्याच्या आदले दिवशीं आपणाकडून आलेलें पत्र घेऊन बाईसाहेबांकडे ताईसाहेब आल्या नी बराच वेळ कांहीं हलुहलू बोलत होत्या—"

योगेंद्रानें घाबरून विचारिलें, " तर काय माझें पत्र विनोदिनीच्या हातीं मिळालें होतें ? "

माधी घाबरल्यासारखी करून म्हणाली, " पण मी काय हें उगीच वेड्यासारखं बोलून गेलें. आतां सगळ्या दोषाचं खापर माझेच माथीं फुटायचं ! मी स्वतः आपल्या हातांनीं ताईसाहेबांना आलेलीं पत्रें नेऊन देत असें. मग पत्रें मिळणार नाहींत कशीं ? "

योगेंद्र मोठ्या बुचकळ्यांत पडला. यांत खरी गोष्ट कोणती हें कांहीं त्याच्या लक्षांत येईना; तथापि माधीचें सांगणें खोटें असावें असें त्यास वाटून फार राग आला. तो तिला म्हणाला, " माधी ! तूं माझी ही सारी थट्टा का करीत आहेस ? "

" भलत्याच गोष्टींत मी कशी बरें आपली थट्टा करीन बाबूसाहेब !

योगेंद्र फार संतापून म्हणाला, " तर काय कमलिनीनें सारें मला खोटेंच सांगितलें ?"

" तें मी काय सांगूं ? "

योगेंद्राचा क्रोध आतां अनावर झाला. तो संतापून म्हणाला,

" चालती हो माझ्या डोळ्यांसमोरून चंडाळणी ! "

माधीनें रडत रडत विचारिलें, " यांत माझा काय दोष ? आपण जर मला विचारलं नसतं, तर मला एवढं सारं सांगायची काय जरूर होती ? माझी यांत कसली चूक बाबूसाहेब ? "

योगेंद्र म्हणाला, " तूं पिशाचिनी, राक्षसी, सर्वनाशिनी आहेस. तूं येथून चालती होतेस कीं नाहीं बऱ्या बोलानें ? "

माधी हें ऐकून बाहेर निघून गेली; आणि स्फुंदत स्फुंदत रडूं लागली. तिच्या रडण्याचा आवाज ऐकून योगेंद्र विरक्त वृत्तीनें आत्मगत म्हणाला, " स्त्रियांची रचनाच साऱ्या अनिष्टांचें मूळ आहे. "

आतां योगेंद्राला ही एक नूतन मानसिक व्याधि जडली. दीर्घ निःश्वास सोडून कपाळावर हात ठेवून तो बिछान्यावर धाडकन् पडला.

---

# अष्टम परिच्छेद.

## विकार.



सुमारें एक तासानंतर कमलिनी नीलरतनास घेऊन योगेंद्राच्या खोलींत आली. वाटेंतच दारावर तिला माधी भेटली.

माधी हळूच तिला म्हणाली, " रोगानें पुनः उचल खाल्ली. "

" मग यावर औषध ? "

" एवढ्यांतच नको. आणखीही जास्त वाढूं द्या. "

" मग आपोआपच का वाढेल ?

" नाहीं. त्यास कुपथ्याची आवश्यकता आहे. मी थोडेंसें दिलेलंच आहे. आपणहि थोडंसं द्या. "

" कोणत्या रीतीनें ? "

" जसा भाषणाचा ओघ येईल त्याप्रमाणें. पण हें बघा बाईसाहेब ! आपणाखातर मी मात्र मधल्यामधीं मारली जाणार. माझ्यावर बाबूसाहेबांचा फार राग आहे. आजपर्यंत जें झालें तें झालें पण इतःपर मी आपली या भानगडींत पडत नाहीं. तुम्हांला जसं सुचेल तसं करा. "

" हें काय असं माधी ? पोट भरलं तर पाठ सगळं कांहीं सहन करील. "

" तें खरें पण—"

नंतर दोघीजणी बराच वेळ एकमेकींशीं हळुहळू कुजबुजूं लागल्या. इतक्या वेळांत कमलिनीच्या कडेवरून उतरून नीलरतन योगेंद्राकडे जावून आपल्या बोबड्या शब्दांनीं त्याचें मन रिझवूं लागला होता. तो पुनः वार्तालापांत दंग असलेल्या कमलिनीकडे येऊन म्हणाला, " काकी ! मामा पुनः आजारी आहेत वाटतें ? "

कमलिनी जलदीनें योगेंद्रबाबूंच्या खोलींत आली. इकडे नीलरतन योगेंद्रबाबूंच्या दोन कुत्र्यांबरोबर खेळूं लागला.

कमलिनीनें वर जाऊन पाहिलें तों योगेंद्र डोळे मिटून बिछान्यावर पडला आहे असें तीस आढळून आलें. तिनें हांक मारिली, " योगिन् ! "

योगेंद्र उठून बसला पण त्यानें मुखावाटे एक शब्दही उच्चारला नाहीं. काय बोलावें, हेंच मुळीं त्याच्या लक्षांत येईना. कमलिनीनें म्हटलें, " योगिन् ! तुमची प्रकृति का पुनः बिघडली आहे ? "

" होय. "

" ती कशी ? "

योगेंद्र म्हणाला, " माधीला तूं जाणत नाहींस. माधी सर्वनाशिनी आहे. माधी केंव्हां केंसानें गळा कापील तें समजणार नाहीं. तूं तिची संगत सोडून दे. "

कमलिनी विस्मित होऊन म्हणाली, " कां बरें योगेंद्र ! तिनं असं केलं तरी काय ? "

योगेंद्रानें तिला इत्थंभूत हकिगत सांगितली. ती ऐकून कमलिनी म्हणाली, " खरोखरीच ही अनुचित गोष्ट आहे. माधी कशी झाली तरी दासी ! तिनें वास्तविक पहातां आपल्या पायरीनें राहिलें पाहिजे. खरी असो वा खोटी असो पण आमच्या घरच्या गोष्टींत पडावयाचें तिला कारण काय ? एवढ्याचसाठीं तिला मी आतां घरांतून घालवून देणार. विनोदच्या गोष्टींत पडावयाचें तिला काय कारण ? "

हें ऐकून क्षणमात्र योगेंद्र विचारमग्न झाला. आपले पासून कांहींना कांहीं गोष्ट कमलिनी लपवीत आहे खास हें त्याच्या तेव्हांच लक्ष्यांत आलें. तो म्हणाला, " मला वाटतें माधीनें हें निवळ थट्टेनें सांगितलें असावें. पण कमलिनी ! खरा काय प्रकार आहे तें तूं मला सांग पाहूं. "

" असल्या भलत्यासलत्या गोष्टींत थट्टा ती कसली करायची ? थट्टा करावयास तिला दुसरे विषय नव्हते वाटतें ? जी सांगण्यासारखी गोष्ट नाहीं, ती जाणूनबुजून तिनें कां म्हणून सांगावी ? "

योगेंद्राचें मन अधिकच चंचल झालें. गंभीरतेनें तो म्हणाला, " तर काय तिनें जें कांहीं सांगितलें तें सारें खरेंच आहे एकूण ? आणि जर तसें असेल तर मग यांत तिचा काय दोष ? "

कमलिनी रागाचा उसना आविर्भाव आणून म्हणाली, " काय दोष ? खरी किंवा खोटी गोष्ट असो पण तिला सांगावयाची काय जरूर होती ? विनोदिनीच्या हातून

जाणूनबुजून म्हणा कीं नकळत म्हणा कांहीं अपराध घडला तर तो चव्हाट्यावर आणण्याची या सटवीला काय गरज? मी तर आतां तिचें तोंडसुद्धां पहावयाची नाहीं; आतांच–या घटकेस–तिला हांकून लावणार. ”

योगेंद्राचें चित्त अधिकच विचलित झालें. विनोदिनीच्या बाबतींत कांहीं तरी भयंकर गूढ असून कमलिनीला तें सारें ठाऊक आहे. पण ती मुद्दामच सांगण्याची टाळाटाळ करीत आहे असें त्यास वाटून व्याकूळ स्वरांत शेवटीं तो म्हणाला, “ कमलिनी! मी तुझ्या पायां पडतों, पण खरें काय असेल तें स्पष्ट सांगून टाक. ”

“ काय सांगूं योगेंद्र? ”

“ विनोद गरोदर आहे किंवा नाहीं? ”

“ हें पहा योगिन्! विनोद बालिका आहे. उचितअनुचित कळण्या इतकी तिच्या आंगीं पात्रता नाहीं. म्हणून आतां तिच्या तसल्या गोष्टींकडे लक्ष्य देणें योग्य होणार नाहीं. ”

“ तर काय विनोद गरोदर आहे हा शुभ समाचारसुद्धां मला कळूं नये वाटतें? ”

विनोदिनी पहिल्याप्रमाणेंच कांहीं तरी जबाब देऊन टाळाटाळ करूं लागली. ती म्हणाली, “ विनोद माझी बहिण आहे. तिला मी लहानाची मोठी केलेली आहे. माझं आणखी दुसरं कोण आहे? ती मला प्राणापेक्षांहि जास्त आहे. माझ्याच्यानं तिचा अपराध कसा बरं सांगवेल? कुणी माझ्या गळ्यावर सुरी जरी ठेविली तरी या बाबतींत मी मुखावाटे एक ब्रहि उच्चारणार नाहीं. ”

भाषणाच्या अंतिम भागाच्या समाप्तीबरोबर कमलिनीच्या नेत्रावाटे गंगायमुनांचा प्रवाह सुरू झाला. यामुळें योगेंद्राच्या मनांतील संदेह, विश्वास आणि कुतुहल एवढा वाढला कीं, त्याचक्षणींच त्याचा मनावरील ताबा डळमळूं लागला. विनोदिनीच्या हातून अशी कोणती अनुचित गोष्ट घडली असावी कीं, जिचा मजजवळ उच्चार करण्याचेंहि धार्ष्ट्यं कमलिनीला होत नाहीं याचा तो स्वतःशींच खूप विचार करूं लागला. कातरस्वरांत तो म्हणाला, “ कमलिनी विनोदिनीवर तुझें भारी प्रेम आहे हें मी जाणतों. पण मी झालों तरी तुला कोणी परका का आहें? ज्या स्नेहाच्या प्रभावानें विनोदिनी तुझी आहे, त्या स्नेहावर माझा नाहीं का कांहीं अधिकार? माधीच्या तोंडून मी जें कांहीं ऐकिलें

आहे, तें ऐकून माझे मनास किती दारुण यातना होत आहेत याची आहे का कांहीं तुला कल्पना ? आणि खरा प्रकार तुला माहित असून तूं जर तो मला सांगण्याची अशी टाळाटाळी केलीस, तर तुझा मजवर मुळींच लोभ नाहीं असेंचना मी गृहीत धरावें ? अशा रीतीनें मला कष्टांत लोटून जर तुला निश्चिंतता वाटते तर माझ्या आजाराची गोष्ट कळतांच येथपर्यंत येण्याची तसदी तरी तूं विनाकारण कां घेतलीस ? माझी रात्रं-दिवस सेवाशुश्रूषा करून कां म्हणून मला काळाच्या दाढेंतून वांचविलेंस ? तुझा मजवरील स्नेह कृत्रिम असेंचना मी इतःपर समजावें ? तुझें काळीज असें पाषाणासारखें असेल असें कांहीं हा वेळपर्यंत मला वाटत नव्हतें. स्त्रीचरित्र असें अगम्य आहे याचा आजच प्रथमतः मला अनुभव येत आहे."

कमलिनी रडूं लागली. ती म्हणाली, 'योगेंद्र ! मी आपणांवरील करीत असलेल्या स्नेहाबद्दल आपणांस अभिमान का वाटत आहे ? आपल्यावर माझं किती प्रेम–किती स्नेह–आहे हें कोणत्या रीतीनें मी आपल्या निदर्शनास आणून देऊं बरें ? माझ्या हृदयांत आपल्याविषयीं किती अगाध प्रीति सांचून राहिलेली आहे हें नाहीं आपल्याला कळा-यचं ! योगिन् ! आपणांसाठीं मी अहोरात्र किती तळमळत असतं तें एका देवाला माहित असलं म्हणजे पुरे ! प्राणाहूनहि आपण मला जास्त आहांत; एखादवेळ विनोदिनीला विपद्पंकांत रुतलेली पहावेल, पण आपणांस कोणत्याहि गोष्टीचं जरासुद्धां दुःख झालेलं नाहीं माझ्यानें पहावणार ! योगेंद्र ! नका हो माझा असा उपहास करूं–मला असें दूर लोटूं. हाय ! जगत् निर्दय आहेच नी–तुम्ही–तुम्हीहि निष्ठुर कसे बरें..."

कमलिनीच्यानें अधिक बोलवलें नाहीं. तिला रडण्याचा एकच उमाळा आला. दुःखाची गोष्ट आहे कीं, सर्वांचीं मनें कांहीं सारखीं नसतात. कमलिनीनें ज्या हेतूनें आपलें हृद्गत उघड करून दाखविलें तो हेतु कांहीं सरलस्वभावी, पापभीरु योगेंद्राच्या लक्ष्यांत आला नाहीं. कमलिनीसारख्या उदारहृदयी, स्नेहपरायण कामिनीला, आपण उद्वेगाच्या भरांत पाषाणहृदयी म्हटलें म्हणून तिच्या कोमलहृदयास इतकें वाईट वाटलें असावें असा त्याचा तर्क झाला. तेव्हां झालें तें कांहीं चांगलें झालें नाहीं असें वाटून तो म्हणाला, "कमलिनी ! अशी मजवर रागावूं नकोस; विनोदिनी तुला प्राणाहूनही प्रिय आहे हें मी जाणतों. तिचा दोष सांगावयास तुझें मन धजत नाहीं हेंसुद्धां मला समजतें. पण

खरा प्रकार काय आहे हें जाणण्याची केवढी तीव्र जिज्ञासा माझ्या मनांत प्रबळ झाली आहे हें तुला कसें कळणार ? एवढ्यावरून जर माझे तोंडून एखादा तुला टोंचून लागण्या-सारखा शब्द गेला असेल तर मला क्षमा कर. तुझ्या डोळ्यांत अश्रु पाहून मला मनस्वी खेद वाटतो. मला सारी हकिगत सांगून माझ्या मनास लागलेली हुरहुर एकदां घालीव पाहूं. ”

कमलिनी मनांतल्या मनांत जळफळून आपल्याशींच म्हणाली, “ चुलींत जावो ती विनोदिनी ! तिच्यासाठीं आपण इतके व्याकुळ झालां अहां; पण तिचा आपणांस विसर पडल्याशिवाय-तिच्याविषयीं आपलं मन कलुषित केल्याशिवाय—माझी आशा कशी सफल होणार ? मी आतां हेंच करणार ! माझी वासना पुरी होवो वा न होवो पण आप-णांस कांहीं विनोदिनीचा होऊन रहावयास देणार नाहीं. हीच माझी प्रतिज्ञा ! ”

नंतर उघडपणें ती म्हणालीं, “ योगेंद्र ! आपणांला कष्ट होताहेत हें मी जाणत्यें, अन् मी ते दूरहि करीन. पण तत्पूर्वी विनोदिनीचा अपराध मनावर घेणार नाहीं असं सांगा पाहूं ! ”

कोणत्या प्रकारच्या घटनेच्या प्राबल्यानें कोणत्या मानसिक प्रवृत्तीचें कसें परिवर्तन होतं हें योगेंद्र जाणत नव्हता. तो म्हणाला, “ त्याबद्दल तूं काळजी सोड. विनोदिनीच्या हातून कितीहि जरी अपराध घडले तरी ते क्षम्य आहेत. माझ्या दृष्टीनें विनोद मला सुधाच आहे. ”

कमलिनी मनांत म्हणूं लागली, पण याच सुधेचं रूपांतर जोंपर्यंत विषांत होणार नाहीं तोंपर्यंत मी स्वस्थ कुठची बसायची ? ”

उघडपणें नंतर तीं म्हणाली, “ देव करो आणि तिजवरील आपलं प्रेम निरंतर शुक्लें-दुवत् वृद्धिंगत होवो ! तिच्या हातून कांहीं दोष घडल्यास ते क्षमा करणें हेंच उचित. बोला, तुम्हांला काय कळलं पाहिजे ? ”

“ सांग तर, विनोदिनी गरोदर आहे ? ”

“ नाहीं. ”

योगेंद्र चपापून म्हणाला, “ मग त्यावेळीं तूं मला तसें कां सांगितलें होतेंस ? ”

“ केवळ प्रसंगाकडे लक्ष देऊन योगेंद्र ! तसं त्यावेळीं मी सांगितलें नसतं तर आपली चिंता अधिकच वाढती.

" विनोदिनी खुशाल तर आहे ना ? "

" होय. "

" माझें पत्र तिला मिळालें होतें काय ? "

" आपलीं किती तरी पत्रें मिळालेलीं मी पाहिलें आहे. "

क्षणभर स्तब्ध राहून योगेंद्रानें विचारिलें, " मग तिनें उत्तर न पाठविण्याचें कारण ?"

" मला नाहीं माहीत ? मी तिला या विषयीं बरेचदां विचारलं पण कोण जाणे ! आजकाल तिचं एकेक वर्तन पहावं तों आपलं चमत्कारिक ! "

योगेंद्र बराच वेळ विचार करून म्हणाला, हें पहा कमलिनी ! स्वप्नांतसुद्धां जें मला खरें वाटलें नसतें तेंच मी आज प्रत्यक्ष तुझे तोंडून ऐकत आहें. ही गोष्ट जर कोणी दुसरा सांगता, तर त्यावर माझा केव्हांहि विश्वास बसला नसता. पण तूं माझी प्रत्यक्ष मेव्हणी—एवढ्या आर्जवानंतर—मला हें सारें सांगतेस तेव्हां मला वाटतें, विनोदिनीला वेड लागलें असावें दुसरें काय ? "

कमलिनी आत्मगत म्हणाली, " खरोखर, विनोदिनी ! तूंच या जगांत धन्य आहेस ! तुझ्यावर योगेंद्राच्या असलेल्या अगाध प्रेमास सीमा नाहीं. पण हें प्रेम चिरकाल मी टिकूं देणार नाहीं तरच मी नांवाची कमलिनी ! "

नंतर उघडपणें ती म्हणाली, " तें मी काय सांगूं ? घरगुती कामांत पहावें तर तिची वृत्ति पूर्वीप्रमाणेंच आहे. पूर्वीप्रमाणेंच ती हंसून खेळून असते. मग तिला वेड लागलें असं कसं म्हणतां येईल ? योगेंद्र ! काय सांगूं मी तुम्हांला ? विनोदिनीच्या विचारानें मी तर अगदीं झुरणीला लागल्यं आहें. वेळ आली म्हणजे योग्य संधि पाहून मी ही गोष्ट पुढं मागं आपणांशीं काढणारच होत्यं; आणि आज सहज तसा योगही आला हें एका अर्थी बरं झालं म्हणायचं ! आतां शांत व्हा नी तिचा दोष पोटांत घाला. आणखी मला या बाबतींत आतां कांहीं विचारूं नका अन् मी याहून अधिक कांहीं जाणतच नाहीं. मग सांगणार कोठून ? "

योगेंद्र हताश होऊन म्हणाला, " मला आणखी ऐकून घ्यावयाची कांहीं आवश्यकता नाहीं. माधीचा यांत कांहीं एक दोष नाहीं. मी व्यर्थ तिजवर रागावलों. तूं आतां कांहीं एक बोलूं नकोस. "

पुनः थोडा वेळ विचार करून तो म्हणाला, "आणखीहि एक दोन गोष्टी विचारूं का ?"

" विनोदिनीसंबंधाच्या ? "

" होय. "

" कशाला आतां ? योगिन् ! जाऊं द्या ती गोष्ट आतां; शांत व्हा. विनोद बालिका आहे. "

पण कमलिनी ! मी विनोदिनीचा अपराध मनावर घेणार नाहीं असें तुला अगोदरच सांगितलेलें आहे ना ? मी आजारी होतों हें तिला कळलें होतें का ? "

"मी काय सांगू माझं कपाळ! तरीच अभागिनी विनीचा आतां सर्व नाश होणार असं मला वाटलंच होतं; नी मी चंडाळीण तिच्या सर्व नाशास कारण झाल्यें. योगेंद्र ! ज्या अर्थी मी आपणांस एवढं सर्व सांगितलं आहे त्याअर्थी माझी एक विनंति आपण कराल ना मान्य ? आपण विद्वान्, बुद्धिमान् समंजस अहांत; विनोद अजाण बालिका आहे ! योगेन्द्र ! तिच्यावर जर आपण रागवाल तर माझ्चि आण आहे आपल्याला. मी काय जन्माची अभागिनी—माझ्याकडे पहा, योगिन् ! माझ्याकडे पहा अन् तिला क्षमा करा."

कमलिनीचे डोळे पुनः अश्रूंनीं भरून आले. पदरानें तिनें ते पुसून काढले. मानवी-हृदयाची सहनशीलता कोठपर्यंत असते हें तिला चांगलेंच अवगत होतें.

योगेंद्रानें म्हटलें, " तसेंच होईल कमल ! सांग आतां, विनोदिनीला माझ्या आजारीपणाची हकिगत समजली होती का ? "

" तिनंच तर मला रजिस्टर पत्र दाखवून म्हटलं, ' ताई ! हें आलं आहे पत्र तिकडून. सांग आतां पुढं काय करूं तें. कलकत्त्यास जाणं मला तर बाई ठीक दिसत नाहीं नी. माझे जीवासहि हल्लीं चांगलंसं नाहीं. त्यांनां काय ? जरा काय झालं तर राईचा पर्वत करायची भारी सवय ! बिघडली असेल जराशी प्रकृति, सुधरेल आपोआप चारदोन दिवसांत ! मी तिकडे जावून काय करणार ?' हे तिचे शब्द ऐकून मी तर अगदीं दिग्मूढ झाल्यं नी म्हणाल्यं, ' विनी ! तुझी बुद्धि चळली आहे वाटतं. ' नंतर मीच इकडे निघून आल्यं. "

योगेंद्र बराच वेळपर्यंत कपाळावर हात टेंकून बसला. संसार त्याला शून्य, तापद वाटूं लागला. अफाट सागरवत् संसारांत आपला एकटाच जीव असून तो पावलोपावलीं अफाट दुःखरूपी लाटांनीं आंदोलित, विचलित व विपर्य्यस्त होऊन दूर जावून पडत आहे असें त्यास वाटूं लागलें. या विस्तीर्ण सागरांत आश्रयस्थान असें एकहि त्यास आढळेना; मागें पुढें, समोर, चोंही बाजूंस सर्वत्र विपदस्थिती ! हाय ! भयानक जलचर त्याच्यासाठीं हो–त्याच्यासाठीं ' आ ' पसरून बसले होते–निदान योगेंद्राला तरी तसें वाटत होतें.

कमलिनी विचार करूं लागली कीं, " कुपथ्य हटकून आतां आपला प्रभाव गाजविणार. पण आणखीहि आगींत तेल ओतलें पाहिजे. "

ती उघड म्हणाली, "सोडून द्या आतां त्या साऱ्या गोष्टी! अन् दुसरं कांहीं तरी बोला."

गंभीर स्वरांत योगेंद्र म्हणाला, " मी का निर्जीव पाषाण आहें? छे, छे, या घटनेचें विस्मरण मला कालत्र्यींहि होणार नाहीं. कमलिनी! मी तुला आणखी विचारावयास मागतों कीं, तूं येथें आल्यावर विनोदिनीचीं तुला कांहीं पत्रें मिळालीं का? "

स्वतःची मोठी अनिच्छादर्शवून कमलिनी म्हणाली, " पत्रें! होय, दोन चार आलीं."

" आहेत का तीं सध्यां तुझ्याजवळ? "

" असतील वाटतं " क्षणमात्र विचारमग्न झाल्यासारखें दर्शवून कमलिनी म्हणाली, " नुकेंच मला नीलरतनानं दिलं आहे एक पत्र. मी तें चांगलंसं वाचलंसुद्धां नाहीं या गडगबडींत. हेंच एक आहे सध्यां जवळ. "

" दे तर तें मला. "

त्याच्याशीं आपणाला काय करायचं आहे? मी नाहीं देणार तें आपणांला. "

योगेंद्र डोळे लाल करून म्हणाला, " मला तें दिलेंच पाहिजे. "

कमलिनी पत्र बाहेर काढून म्हणाली, " तें मीं आपणांस दाखविणार नाहीं. पण फाडून त्याचे तुकडे तुकडेच करत्यं! "

योगेंद्रानें झटकन् तें पत्र तिच्या हातांतून हिसकावून घेतलें. तेंच! तेंच पत्रांतील चिरपरिचित अक्षर! योगेंद्र तें पत्र वाचूं लागलाः—

' ताई! तिकडच्याविषयीं कांहींहि तूं आतां पत्रांत लिहीत जावूं नकोस; जर त्यांनीं माझेविषयीं कांहींहि तुझेपाशीं विचारपूस केली तर म्हणावें कीं, मी खुशाल आहें. माझी कोणतीहि गोष्ट त्यांचे कानांवर न जाईल तितकें चांगलें. कळावें हे विज्ञापना. '

' **विनोदिनी** '

**ताजा कलमः**—तूं केव्हां इकडे परत येणार?

योगेंद्रानें एकवार पत्र वाचलें; तेव्हां हें असंभवित आहेसें त्याला वाटूं लागलें. पुनः वाचलें. या खेपेस पत्र त्याच्या हातांतून गळून पडलें. तो म्हणाला, कमलिनी! फार चांगलें. केलेंस हें! ज्या प्रतारणेंत मी आजपर्यंत बद्ध झालों होतों त्यांतून तूंच माझी आज अशी मुक्तता केलीस. हाय! पृथ्वींत इतकें पाप आहे हें कोणाला माहित होतें? "

योगेंद्र धडकन् मूर्च्छित होऊन पडला. कमलिनी आपल्याशींच म्हणाली, " आतां मात्र विष सर्वांगांत भिनलें गेलें आहे. "

---

# नवम परिच्छेद.



## दुसरीकडे.



दो हींकडे बरोबर आग भडकली !

आतां एकवार विनोदिनीची हालचाल आपणांला तपासली पाहिजे. प्रिय वाचक ! तिची मानासिक स्थिती कशी आहे हें जाणून घेणें आपलें कर्तव्य नव्हे काय ?

वीरग्रामांतील आपल्या रहात्या घराच्या एका खोलींत विनोदिनी बिछान्यावर पडली होती. खोलीचे सारे दरवाजे उघडे होते. विनोदिनीच्या नजरेसमोरच एक मनोहर उद्यान होतें. पण यावेळीं त्या उद्यानाकडे विनोदिनीचें लक्ष्य नव्हतें. तिचा चेहरा उदास दिसत होता. दारुण चिंतेनें तिच्यावर आपला पूर्ण पगडा बसाविला होता. एखाद्या रोग्याप्रमाणें ती अगदीं क्षीण झालेली दिसत होती. तिच्या देहावर कांहीं तेज नव्हतें; अंगावर भूषणें नव्हतीं, केसांची नीट जोपासना केलेली नव्हती. मधून मधून तिचे डोळे आसवांनीं भरून येत. बऱ्याच वेळानंतर 'हे जगदीश्वर ! तुझ्या मनांत हेंच का होतं ?' असें बोलून तिनें दीर्घ निःश्वास सोडला. मनांत घोळणारे विचार किंचित्काल तरी दूर व्हावेत म्हणून तिनें उद्यानाकडे आपली दृष्टि स्थिर केली. तिनें पाहिलें, सरसीच्या हृदयावर अमल धवल मरालमाला विकसित पुष्पांसमान राहिली होती; कांहीं पक्षी जलांत यथेच्छ विहार करीत होते; बक साधुश्रेष्ठांचें रूप धारण करून संधि येतांच मत्स्यसंहार करून आपली क्षुधा शमवीत होते. सरोवराच्या सभोंवतीं चित्रविचित्र फलपुष्पें रसिक चित्तास मोह पाडीत होतीं. त्यांपैकीं कांहीं विकसित, कांहीं मुकुलित तर कांहीं भूशय्येवर लोळत होतीं. लताकुंजादिकें करून तें स्थान सर्वतोपरी रमणीय व मनोल्हादक वाटत होतें. विनोदिनीनें आणखी पाहिलें, दोन बुलबुल पक्षी निकुंजांत घुसले. पहिल्या बुलबुलानें जवळच्या लतेवर लटकत राहून एका लाल रंगाचे पुष्पास चोंच लाविली. दुसऱ्यानेंहि असेंच करावयाचा प्रयत्न केला पण तो निष्फल ठरला; कारण त्याची चोंच फुलापर्यंत

पोंहचली नाहीं. त्याची मनीषा सफल झाली नाहीं, तेव्हां पहिल्यानें त्याला स्वस्थान दिलें. पण आतां दुसऱ्यानें फुलाकडे न पहातां पहिल्याच्या चोंचेला चोंच भिडविली. पहिल्यानें मंजुळ गायन गावयास सुरवात केली. त्या मधुरतर गायनाचा अर्थ कळतो आहे का कुणाला ? मानवी प्राण्यांच्या उच्च मनोवृत्तींनीं विहगहृदयांतसुद्धां का प्रवेश केलेला आहे ? जर असें असेल तर भविष्यकालीं कोणी बुलबुल जोडपें रोमिओ आणि जुलियेट, ओथेल्लो आणि डेसडिमोना किंवा शकुंतला आणि दुष्यंत यांजप्रमाणें एखाद्या काव्यांतील नायक–नायिका होऊन जगतांत अमर होणार नाहीं कशावरून ?

विनोदिनीनें हें दृश्य पाहिलें; पण तिच्या हृदयांत जी आग भडकली होती, ती कांहीं शांत झाली नाहीं. ती उठून बसली आणि उशीखालून एक पत्र काढून वाचूं लागली:—

" प्रिय भगिनी,

मला तुझीं पत्रें वेळेवर मिळतात; नी मीसुद्धां त्यांचा जबाब पाठवित्यें. तुला केवढें दुःख वाटत आहे हें मी जाणत्यें; परंतु भगिनी उपाय काय ! तारुण्यांत अशा प्रकारचे प्रमाद हातून घडणें व एकदां ही निंद्यखोड जडली कीं, मग ती मुळीं सुटणें शक्यच नाहीं असं समजणं असंभवनीय का वाटतं तुला ! मला फार आशा आहे कीं, योगेंद्राला जडलेली ही संवय हळूहळू नाहींशी होईल. योगेंद्र अलीकडे वारयोषितांचे उंबरठे झिजवित असतात. अन् त्यांच्या सहवासांत जगांतील सारं सुख एकवटलेलें आहे असा त्यांचा समज झालेला दिसतो. नुक्ताच ह्मणे, असा एक कायदाहि झालेला आहे कीं त्याच्या योगं कोणाहि पुरुषास वारयोषितांशीं खुशाल लग्नहि लावतां येतं या कायद्यान्वयें योगेंद्रबाबू त्या कुलटेबरोबर लौकरच विवाह करणार आहेत असें मी ऐकलें आहे. सटवी एकदां मरती तर ठीक झालें असतें. जर कां ती चंडाळीण माझ्या तडाक्यांत सांपडेल, तर × + + चे धिंडवडे काढावयास मी मुळींच मागंपुढं पहाणार नाहीं. तूं या बाबतींत कांहीं काळजी करूं नको. ह्या क्रम आतां जास्त दिवस चालावयाचा नाहीं असं मला दिसतं आहे. मी योगेंद्रबाबूंस तुझं पत्र दाखविलं, तेव्हां ते हंसून ' फार चांगलं ' ह्मणाले मी लौकरच तिकडे निघून येईन; आणि साधल्यास योगेंद्रबाबूंससुद्धां येतांनां बरोबर आणीन. विशेष अडचण हीच कीं, त्यांची माझी भेट क्वचितच होते. पुढें जें जें होईल, तेंतें लिहीत जाईन. तूं सावध रहा. तुझी मला फार काळजी लागली आहे. कळावें. हे आशिर्वाद. '

विनोदिनी बराच वेळपर्यंत पत्र वाचून रडूं लागली. ती स्वतःशींच विचार करूं लागली, "धन्य तीच वारयोषिता! या जगांत तीच एक पुण्यवान्! तिनंच आपल्या जन्माचं सार्थक केलं आहे; म्हणूनच तिला तिकडच्या अक्षय प्रेमाचा लाभ झालेला आहे आणि मला अभागिनीला? माझ्यांत असले गुणतरी कोणते आहेत? प्राणनाथ! ज्या गोष्टींत आपणाला सुख वाटत आहे, त्यासुखाआड मी केव्हांहि यायची नाहीं. आपले हातून घडणारें कृत्य बरें असो वा वाईट असो; पण हृदयेश्वर! ईश्वराजवळ माझी रात्रंदिवस हीच प्रार्थना आहे कीं, प्रभो! तिकडच्या सुखांत केव्हांहि व्यत्यय आणूं नकोस; नाथ! पण माझे हृदयास किती भयंकर यातना होताहेत याची आहे का कांहीं कल्पना? मी माझ्या मनांतील ही तळमळ कोणत्याप्रकारें शांत करूं? स्वर्गांतून नरकांत पडतां पडतां मला कोण बरं सांवरील? प्राणेश्वर! आपण सुखी अहां एवढं मला समजल्यं नी मग या अभागिनीला मरण जरी आल्यं तरी मी आनंदानें मरेन. पण मरणापूर्वी आपल्या चरणाचं दर्शन व्हावं ही एक माझी इच्छा आहे."

इतक्यांत एका दासीनें येऊन मास्तर महाशय आल्याची वर्दी दिली; आणि पाठोपाठ ते स्वतः तेथें येऊन पोंहचले. विनोदिनीची ही अवस्था पाहून विस्मयानें ते म्हणाले, "हें काय देवी! तुझी ही अवस्था कशानें झाली अशी?"

विनोदिनीनें कांहीं जबाब दिला नाहीं; पण खालीं मान घालून ती रुदन करूं लागली.

हरगोविंदबाबू म्हणाले, "विनोद! देवी! अशी रडतेस कां? काय झालें तें तर मला कळूं देशील कीं नाही? योगेंद्र तर खुशाल आहेत ना?

अंतिम प्रश्न ऐकून विनोदिनी आणखीहि जास्त रडूं लागली.

मास्तर महाशय म्हणाले, "हें काय तुझें हें रडणेंच पहावयासाठीं का मला तूं बोलाविलें होतेंस?"

विनोदिनीनें उशीच्या खालून पत्रें काढून तीं मास्तर महाशयांच्या हातीं दिलीं; आणि खालीं मान घालून ती रडूं लागली. हरगोविंदबाबूंनीं तीं सहाहि पत्रें वाचून पाहिलीं. कमलिनीच्या हातचीं तीं पत्रें पाहून ते म्हणाले, "मला हें कांहीं खरें वाटत नाहीं. कमलिनीचा चुकीचा समज झालेला दिसतो."

रडत रडत विनोदिनी म्हणाली, "मग तिकडून मला एकही पत्र कां बरं पाठवणं झालं नाहीं?"

" या वेळींसुद्धां तुला एकहि पत्र नाहीं का मिळालें ? "

" नाहीं. ताई लिहीत्ये त्यांनीं माझें नांवच घेण्याचं टाकलं. काय बरं माझे हातून तिकडचा असा घोर अपराध झाला ? "

विनोदिनी पुनः रडूं लागली. हें हृदयविदारक दृश्य पाहून मास्तरमहाशयांचे डोळेहि पाण्यानें भरून आले. ते गंभीर आवाजांत म्हणाले, " काय आहे कोण जाणे ! "

बराच वेळ विचार केल्यानंतर महाशय पुनः म्हणाले, " मी स्वतः या बाबतींत मन घातल्याशिवाय पत्ता कांहीं लागावयाचा नाहीं. "

विनोदिनी म्हणाली, " ही गोष्ट षट्कर्णी करण्याजोगी नाहीं. तरी पण आपणांवाचून मला तरी कोण या बाबतींत साह्य करणार असें वाटून मीही आपले कानांवर घालीत आहें. ते काय किंवा मी काय दोन्ही आपणांस अपत्यवत् आहोंत. तेव्हां माझं आतां या संकटांतून रक्षण करा; नाहींपेक्षां माझं काय बरें होईल ? "

रडत रडत विनोदिनीनें मास्तरमहाशयांच्या चरणांवर घालून घेतलें. हरगोविंदबाबूंनीं तिला उठवून म्हटलें, " उठ बाळ ! उठ. अशी चिंता उपयोगाची नाहीं. आज जें मी ऐकत आहे, तें मला तर असंभवनीय वाटतें. लौकरच काय तो खरा प्रकार कळून येईल. हीं पत्रें माझ्यापाशींच असूं दे सध्यां; माझी तर समजूत आहे कीं, ही सर्व कमलिनीची चूक आहे. रडूं नकोस, अशी उगीच चिंता करूं नकोस. मी याचा तपास लावितों. "

इतकें बोलून ते तेथून निघून गेले. विनोदिनी कपाळावर हात टेंकून जमिनीवर बसली. तिचे विखरलेले केंस पाठीवर मोकळे सोडलेले होते.

---

# दशम परिच्छेद.

## फार दूर.





दिवसाचे तीन वाजण्याच्या सुमारास कमलिनी आणि माधी योगेंद्राच्या बिऱ्हाडीं आली. या ठिकाणीं हें सांगणें आवश्यक आहे कीं, कमलिनी माधीसह योगेंद्र बरा झाल्यावर आपल्या सासरीं जाऊन येऊन असे. यावेळीं योगेंद्राच्या मनाची स्थिती फारच भयंकर झाली होती. दारुण संदेहानें त्याचें हृदय भरून गेलें होतें. तीच विनोदिनी—कीं, जिचें हेंच आपलेंही जीवन!—हाय! आज अशी झालीना? याहून आणखी ती भयंकर गोष्ट कोणती? कमलिनीला पाहून योगेंद्र म्हणाला, " असें होण्यापूर्वी—या सर्व गोष्टी ऐकण्यापूर्वी—मलाच कसें मरण आलें नाहीं? "

कमलिनी म्हणाली, " योगेंद्र! नेहमीं जर याच गोष्टीचा विचार करीत राहिलांत, तर शरीरावर नाहीं का कांहीं भलतासलता परिणाम व्हायचा? "

योगेंद्र उदासीनतेनें म्हणाला, " होईना कां? त्याच्याशीं मला काय कर्तव्य आहे? "

" हें काय बरं असं योगिन्! तिचे समस्त दोष पोटांत घालण्याचं अभिवचन देऊन आतां असं कां? "

कातरस्वरांत योगेंद्र म्हणाला, " कमलिनी! या जगांत मला आणखी कसचें सुख आहे? तिचे दोष मी मनावर घेत नाहीं. तथापि माझें हृदय शून्य झालें आहे. मी मनाचें सांत्वन करूं तरी कोणत्या प्रकारें? "

कमलिनी म्हणाली, " एका अल्लड, अजाण, अप्रबुद्ध बालिकेच्या गोष्टीकडे लक्ष देऊन आपले मनाची सुखशांती अशी कां बरें नष्ट करितां? योगेंद्र! माझं ऐका नी हें सारं आतां विसरून जा. माझा आपणांवर किती अकथनीय स्नेह आहे हें आहे का ठाऊक आपणांला? आपणांला असे उदास पाहून मला किती कष्ट होताहेत हें एका देवाला ठाऊक असलं म्हणजे पुरे! योगिन्! माझा काय बरं अपराध? मग कां बरं आपण मला असे कष्ट देताहां? आपणांसाठीं—केवळ आपणांसाठीं—माझं हें हृदय काय काय

सहन करीत आहे हें कुठं आपण जाणतां ? योगेंद्र ! मी आपल्या पायां पडत्यें; पण माझी नकोहो अशी उपेक्षा करूं."

कमलिनी वेड्यासारखी बोलत चालली होती; आणि माधीनें जंर तिला हळूच चिमटा काढला नसता तर हें तिचें भाषण कोणत्या थराला पोंहचलें असतें कोण जाणे !

योगेंद्र बराच वेळ विचार करून म्हणाला, " बरें तर ! ज्या गोष्टीपासून तुला कष्ट होतील, त्या गोष्टीपासून मी इतःपर अलिप्तच राहीन. केवळ तुझ्या संतोषा खातर मी ही गोष्ट विसरण्याचा प्रयत्न करीन मग तर झालें ना ? "

कमलिनीच्या अधर प्रांतावर हास्य दिसूं लागलें. योगेंद्राचें हृदय पूर्वीप्रमाणेंच सरल आहे हें ती समजून चुकली. ती म्हणाली, " मी उद्यां वीरग्रामास जाईन म्हणत्यें; आपण कधीं येणार ?

योगेंद्र दचकून म्हणाला, " काय मी ? आणि आतां वीरग्रामास ? या जन्मांत तर नाहींच. "

पुनः त्याच अमृतमयी स्वरांत कमलिनी म्हणाली, " हें काय असं योगेंद्र ! नुक्तेंच तुम्हीं मला सांगितलं कीं, ज्या गोष्टीपासून तुला कष्ट होतील ती मी करणार नाहीं म्हणून ? आपण तिकडे न आल्यास मला नाहीं का व्हायचे कष्ट ? योगेंद्र ! जगतांत जर एखादं मला भारी दुःख असेल तर तें हें एकच ! "

बराच वेळ विचार केल्यावर योगेंद्र म्हणाला, " बरें तर ! मी येईन; पण मागाहून थोड्या दिवसांनीं म्हणजे विनोदिनी मला कोणत्या कारणास्तव विसरून गेली आहे हें कळलें तर कळेल.

कमलिनी बराच वेळपर्यंत खालीं पहात चिंताग्रस्त होऊन राहिली. नंतर म्हणाली, " तर मग योगिन् ! आमची रवानगी करून द्या; "

तिचे डोळे पाण्यानें भरून आले. ते पुसून तुटक स्वरांत ती म्हणाली, " इथं आपणांबरोबर राहून अनुराग मात्र शतपटीनें वाढत आहे. आपण—

कलिनीचें हें वाक्य अपुरेंच राहिलें. ती तशीच रडत रडत बाहेर निघून गेली. खरोखर, कमलिनी देवी आहे असें योगेंद्रास वाटूं लागलें. आपणांवर तिचें किती अगाध व अकृत्रिम प्रेम आहे याचा तो आपणाशींच विचार करूं लागला. कमलिनी निघून गेल्यावर

माधी त्याला म्हणाली, " बाबूसाहेब ! राग नका मानूं; पण आपण बाईस दुःखावलें हें बरं केलं नाहीं. "

योगेंद्र गोंधळून म्हणाला, " झाली खरी माझी चूक ! "

" मीसुद्धां जात्यं तर आतां. "

" नाहीं. जरा थांब. कमलिनीस जाऊन सांग कीं, जरा वेळ थांबून मग

माधी खोली बाहेर पडली. पहाते तों कमलिनी भिंतीवर कपाळ टेंकून

कां बरें ती अशी रडत असावी ?

" मी जो अग्नि पेटविला आहे तो कोण जाणे ! कोठपर्यंत जावून विझण अदृष्टांत काय आहे परमात्मन् जाणे ! मी तर आतां जात्यं. विनोदिनीचं जि करायचं होतं तितकं सगळं मी करून चुकल्यं. पण विनोदिनीचा यांत का दोष नाहीं. ती सरलहृदयी बालिका आहे. स्नेह हेंच तिचें जीवन ! प्रेम सर्वस्व ! पण म्या चंडाळणीनें मात्र तिला दुःखाच्या खोल गर्तेंत लोटून दि मला कोणी परकी होती ? जिच्यावर मायाममता आपोआप जडत असते हा अत्याचार मी कां म्हणून करावा ? मी तिचा सर्व नाश केला आहे या ग वार्तासुद्धां बिचारीला नाहीं. अरेरे ! मला कुठून ही पापी बुद्धि सुचली ? आ तरी काय ? जगदीश्वर !—पण छे, माझ्यासारख्या पापिणीनं तुझा नामो योग्य होणार नाहीं. नाहीं. यां पापकार्यांत मी तुला नाहीं आळविणार नकोच पाहूं ढुंकून इकडे. हाय ! भयंकर यातना ! सर्वांगाची दाही ! तर का पासून परावृत्त होऊं—हें काम निराश होऊन अर्ध्यावरच टाकूं ? छे, छे, इत येऊन आतां मागं पाऊल घेणं अनुचित. स्नेह–धर्म–समाज कोणाच्या सुखासाठीं मी धडपडत आहें, तें मी कांहीं झालं तरी मिळविणारच; या आ होऊन त्यांत जरी मी भस्म झालें तरी बेहेत्तर ! अन् इतकंहि करून म पूर्ण न झाली तर ! तर—हाय ! पूर्वींच मी या गोष्टींचा कसा बरं विचार वे काय करूं ! माझी वासना माझी इच्छा–नाहीं का व्हायची सफल ? अहा ! आतां तें नांव कशाला ? कोण बरं मला आतां मार्गदर्शक होईल ?"

कमलिनी याप्रमाणें चिंताग्रस्त होऊन रडत होती. इतक्यांत माधीनें येऊन निरोप सांगितला. तो ऐकून कमलिनी म्हणाली, " गडे माधी ! मला य

यातनांपासून तूं तरी वांचीव. माझी काय बरं स्थिती होईल आतां ? मी योजलं होतं काय नी हें केलं काय ? माधी ! नाहीं आतां या यातना सहन होत माझ्यानं. "

" इतक्या दूर पर्यंत येऊन आतां असे हात पाय गाळणं ठीक नाहीं. "

" आतांपर्यंत झालं तितकंच पुरे ! आणखी नको. "

" मग मनांतील इच्छा कशी फलद्रुप व्हावी ? "

कमलिनी थोडावेळ सचिंत झाली. शेवटीं निश्चयात्मक स्वरांत ती म्हणाली, " बस्स; ठरला निश्चय ! माझी इच्छा मी पुरी करून घेणारच घेणार. मग माझं कांहींहि होवो ! या वासनेचा माझ्या जीवनमरणाशीं दृढ संबंध आहे. "

" मग आणखीहि जाळीं टाकावीं लागतील–बुद्धि खर्चावी लागेल–मेंदूला थोडे श्रम पडतील. "

भैरवी मुद्रा धारण करून क्रोधकंपित स्वरांत कमलिनी म्हणाली, " चिंता नाहीं. जें व्हावयाचें असेल तें होईल. खोल पाण्यांत उडी तर घेतलेली आहेच तेव्हां कांहीं तरी तळाचा ठाव हा मी लावणारच; विनोद माझ्या मार्गांतील कांटा आहे. तो मी कायमचा दूर करणार ? कशाची माया ? कशाचा मोह ? सगळं–सगळं मिथ्या ! "

कमलिनी आणखी कांहीं बोलली नाहीं. ती लगेच जाऊन गाडींत बसली. गाडीपर्यंत माधी तिच्याबरोबर आली व म्हणाली, " बाईसाहेब ! तुम्ही जा आतां; मी मागाहून येईन. "

गाडीवानानें चाबूक फडकावला. हां हां म्हणतां गाडी–व त्याबरोबर कमलिनीहि–दृष्टिआड झाली.

---

# एकादश परिच्छेद.

## काय ?



धीनें येऊन पाहिलें कीं, योगेंद्रबाबू खुर्चीवर सचिंत मुद्रेनें बसले आहेत. तिनें विचारिलें " मला कांहीं विचारावयाचं का आहे ? "

योगेंद्र जरा हंसून म्हणाला, " माधी ! सांग बरें सुख कशांत आहे तें ? "

माधीनें आश्चर्यचकित होऊन उत्तर दिलें, " सुख चांगलं घर-दार असलं, पैसेटके असले, दागदागिने असले तर सुख मिळतं. "

" यांपैकीं तुझ्यापाशीं काय आहे ? "

" माझ्यापाशीं तें काय असणार ? मी गरीब ! एक मोडकं तोडकं घर आहे नी असतील दहा पंधरा रुपये रोख गांठीला; आपणांसारख्यांनीं मनावर घेतलं तर होण्यासारखं आहे. "

" तुझें तें घर मोडून अगर दुरुस्त करून त्या ठिकाणीं पक्कें घर बांधावयास काय खर्च येईल अजमासें ? "

" रमजानमिस्त्रीला मी एकदां याचविषयीं विचारलं होतं, तेव्हां त्यानें सांगितले कीं, लागतील दीडएक हजार रुपये. बाबुसाहेब ! मी आणणार कोठून इतके रुपये ? निदान या साऱ्या जन्मांत तर नाहीं मला इतके दिसायचे. "

" हें पहा, मी तुला विचारलेल्या प्रश्नांचें जर तूं ठीक उत्तर दिलेंस तर मी तुझें घर बांधून देईन. "

" छे, छे, बाबूसाहेब ! आपण तसं केलं तरच मी खरं खरं सांगेन; एरव्हीं सांगणार नाहीं असं का वाटतं आपणांला ? "

माधी मनांतल्या मनांत फार खुष झाली. आपलें दैव इतके दिवस झांकलें गेलें होतें, पण आतां तें उघडलें गेलें आहे असें तीस वाटलें. इकडे एकीकडे बाईसाहेब तिला लागेल तें देऊं लागल्या व दुसरीकडे बाबूसाहेबही घर बांधून देईन म्हणतात. मग काय व्हा ! त्यांचें कांहीं कां होईना; ज्याचें कर्म तो भोगील. पण आपली तर चंगळ उडणार आहे या विचारानें ही फार हर्षित झाली.

योगेंद्रानें विचारलें, " बरें आतां सांग पाहूं, विनोदिनी मला पत्रेंशीं पाठवीत नाहीं ?"

" तें-तें-तें मला काय माहित ? "

योगेंद्र म्हणाला, " मला सगळें कांहीं कळतें. विनोदिनी असें कां करते हें तुला व तुझ्या बाईसाहेबांस ( कमलिनीस ) पक्कें ठाऊक असून तुम्ही मला सांगावयास टाळाटाळ करितां; कमलिनीची ती प्रत्यक्ष पाठची बहिण. तेव्हां तिच्यानें एक सांगवत नसेल म्हणा, पण तुला तर सांगावयास कांहीं हरकत नाहींना ?

" बाबूसाहेब ! मी काय सांगूं ? "

" काय म्हणजे ? जें तुला ठाऊक असेल तें. दीड हजाराचें घर बांधून देतों म्हणून वचन मी देतों ना तुला ? मग कोणती हरकत ? "

" पण मोठ्या घरच्या गोष्टी आहेत या बाबूसाहेब ! मी गरीब—"

" तूं कांहींहि भिऊं नकोस. काय असेल ते बेलाशक सांग. "

" गोष्ट फार वाईट आहे बाबूसाहेब ! मला तें दीड हजाराचं घर नको नी दार नको. काय करायचं आपल्याला ती गोष्ट ऐकून ? "

" नाहीं माधी ! सांग, मला मुळींच वाईट वाटावयाचें नाहीं. "

" लोक काय हजार तोंडांनीं हजार बोलणारे आहेत. त्यांच्याशी का आपला लागायचा आहे पल्ला ?"

" चिंता नाहीं, चिंता नाहीं, सांग लोक विनोदिनीविषयीं काय बोलतात ? "

" बाबूसाहेब ! माझ्याच्यानें तें आपणांला सांगवत नाहीं. मीसुद्धां जातें आपली वीरग्रामास. "

" माधीच्या या कृत्रिम चाळ्यांनीं योगेंद्रनाथाचा संदेह व कुतुहल चौपट वाढला. तो म्हणाला, " माधी ! तूं मागशील तें मी तुला देईन; पण तुला जें कांहीं ठाऊक असेल तें सांग. "

माधी खोलीबाहेर पडूं लागली. तेव्हां योगेंद्र घाबरून तिचा मार्ग अडवून म्हणाला, " माधी ! मी तुझ्या पायां पडतों. जें लागेल तें मी देईन. पण एवढें सांग. "

माधी स्वतःचा अगदीं निरुपाय झाल्यासारखें दर्शवून म्हणाली. " सांगूं काय माझं कपाळ ! लोक म्हणतात कीं, ताईसाहेब—"

इतकें बोलून माधी गप्प राहिली. योगेंद्रनाथाचें सर्वांग कांपित झालें. डोळे फाडफाडून माधीच्या भाषणाचा राहिलेला शेषअंश ऐकण्यासाठीं त्याचें मन व्याकुल झालें. माधीला

स्तब्ध राहिलेली पाहून त्यानें विचारिलें, "काय लोक ह्मणतात तिच्याविषयीं ! बोल, भिऊं नकोस."

"म्हणतात कीं, ताईसाहेबांची चालचलणूक ठीक नाहीं."

योगेंद्राच्या मस्तकावर विद्युत्पात झाला. भयंकर पन्नगानें जर एखादे वेळ त्याला वेष्टिलें असतें, तरी तो एवढा घाबरता ना; त्याचें हृदय धडधडूं लागलें. चोंहींकडे–सर्वत्र–त्याला अंधार अंधारच दिसूं लागला. शरीरांत जणुं काय !–अस्थि, मांस, रक्त, चर्म कांहींच उरलें नाहीं अशी त्याची एका क्षणांत अवस्था झाली. हजारों वृश्चिकांच्या, सहस्रावधि सर्पांच्या दंशानें किंवा शेंकडों सैनिकांच्या शस्त्राघातांनींहि जेवढ्या यातना झाल्या नसत्या, तेवढ्या साऱ्या या एकाच गोष्टीवरून त्याच्या मनास होऊं लागल्या. बऱ्याच वेळानें योगेंद्र माधीला म्हणाला, "तूं आतां जा. माझें विचारणें आटोपलें."

माधी निघून गेली. घर बांधावयासाठीं दीड हजार रुपये देतों म्हणून योगेंद्रानें जें तिला सांगितलें होतें त्याविषयीं विचारण्यास तिला धैर्य झालें नाहीं. दुसऱ्या एखादे वेळीं ही गोष्ट काढतां येईल. असा विचार करून ती खोलीबाहेर पडली. पुनः योगेंद्र तिला जोराजोरानें 'माधी' 'माधी' म्हणून हांका मारूं लागला. माधी आली तिला त्यानें विचारिलें, "हें तूं शाबीत करून देशील ?"

"संधि सांपडल्यास तसं करतां येईल."

"त्या कुलटेचा हृदयवल्लभ कोण आहे हें तूं जाणतेस ?"

"नक्की कांहीं नाहीं. पण लोक हरगोविंद मास्तर महाशयासंबंधीं गुणगुणतात."

योगेंद्र भ्रांतचित्त होऊन उन्मत्तासारख्या शून्य दृष्टीनें खोलीभर पाहूं लागला असें माधीनें पाहिलें. योगेंद्राच्या डोळ्याचें पातें लवत नव्हतें. ती फार भयभीत झाली. योगेंद्राची विचित्र स्थिती पहातांच भयभीत होऊन ती म्हणाली, "जातें मी आतां बाबूसाहेब !"

योगेंद्रानें कांहींहि उत्तर दिलें नाहीं. बोलण्याचेंहि त्राण या वेळीं त्याच्या आंगीं उरलें नव्हतें; हृदय हृदयाबाहेर होतें. माधी निघून गेली.

संध्या झाली. योगेंद्राचा भाव कांहीं बदलला नाहीं. साधुचरणानें येऊन दिवा लाविला. योगेंद्राला हा वेळपर्यंत भान नव्हतें. दीप प्रकाश पहातांच बाह्यजगताच्या अस्तित्वाविषयीं विचार पुनः त्याच्या मनांत जागृत झाला. आतां तो बिछान्यावर जावून पडून राहिला. पण झोंपेसाठीं–आरामासाठीं–कांहीं नाहीं. अवस्थेच्या परिवर्तनानें हृदय झालें तर थोडेंबहुत शांत होईल, या आशेनें त्यानें असें केलें. पण अहारे भ्रान्ता ! शांति आतां

तुझेजवळ कोठून येणार? ज्या चक्रांत सांपडून तूं घुमत आहेस तें तुला कोठवर नेऊन सोडणार कोण जाणे! जगांत तुझेसाठीं आतां सुख नाहीं. जग म्हणजे पाप, ताप आणि यातना क्लेश यांची मूर्तिमंत खाण! मग कां वृथा अशी शांतीची अभिलाषा बाळगतोस? या जन्मांत तरी तूं तशी आशा धरूं नकोस; तोडायला सर्वांनां सोपें जातें पण जोडणें मनुष्यांच्या शक्ति बाहेरचें आहे. योगेंद्रा, कां तर मग असा कष्टी होतोस? पण हें आमचें सांगणें अखेर अरण्य रुदनवतच होणार!

योगेंद्र तसाच पडला होता. साधुनें येऊन विचारीलें, " संध्याकाळीं काय जेवण केलें पाहिजे? "

उत्तर मिळालें, " कांहीं नको. "

हळुहळू दोन प्रहर रात्र उलटून गेली. कलकत्ता शहरांत सर्व सामसूम झालें होतें. जणुं काय! नगरीचें जीवन तिला सोडून गेलें होतें. बोध होत होता कीं, काळानें ती सर्व नगरी गिळून टाकली आहे. रातकिड्यांचा किर्र ध्वनि या विधानास पुष्टि देत होता. योगेंद्र शय्येवरून उठला. काय करावें व काय करूं नये हें कांहीं त्याला सुचेना. सामान्य परिवर्तनानें मन लागलें तर कुठें लागेल म्हणून योगेंद्र आपल्या अभ्यासाच्या खोलींत गेला. खोलींत एक मेज होतें. मेजावर एक दिवा होता व कांहीं पुस्तकें अव्यवस्थित रीतीनें इकडे पडलीं होतीं. खोलींत चार बाजूस चार कपाटें होतीं. त्यांपैकीं एकांत पुस्तकें, दुसऱ्यांत औषधें, तिसऱ्यांत चिकीत्सकास लागणारी आवश्यक यंत्रसामुग्री व चौथ्यांत कपडे वगैरे होते. टेबला जवळच असलेला एक नर कङ्काल जगाच्या नश्वरते विषयीं सुचवित होता. मृत्यूच्या पराक्रमाचा उपहास करणाऱ्या मानवांचें हास्य उडवून देत होता. टेबलाच्या आस पास तीन बाजूंस तीन खुर्च्या होत्या. दोन्ही हातांनीं आपलें डोकें एकवार खाजवून योगेंद्र दीर्घ निश्वास टाकून म्हणाला, " हाय! " तो सर्व वस्तू एका मागून एक पाहूं लागला. जर त्यापैकीं एखादी वस्तू त्याचे मनास रिझविण्यास समर्थ झाली असती, तर तिच्या योगें त्यानें आपलें दुःख घटकाभर विसरण्याचा प्रयत्न केला असता. पण असें कांहीं झालें नाहीं. पण त्याचे डोळे त्या संज्ञाशून्य, चेतनाहीन शून्य गर्भ मानव कङ्कालाकडे लागले. त्या वेळीं वेड्यासारखा तो बोलूं लागला.

" कङ्काल! या जगांत तूंच सुखी आहेस! मी तुझ्या अवस्थेप्रत पोंहचावयास इच्छितों. तुझी अभिज्ञता पुष्कळ झाली आहे. या जगांत तुला काय पहावयाचें बाकी उरलें आहे? जगतांतील पाप, ताप व कपटतेचा अनुभव घेऊन तूं या सर्वांवर लाथ

मारण्यास सक्त झ ला आहेस. बोल हे देव ! हे प्रभो ! बोल. मी कोणत्या उपायाचें अवलंबन केल्यानें या घोर यातनांपासून सुटेन ? तूं ज्याच्यावर आत्म्याचा आत्मा जाणून प्रेम केलें होतेंस त्यानेंच कदाचित् तुझ्या काळजांत सुरी भोंसकली असेल. हे सर्वज्ञ ! बोल, तूं कोणत्या उपायानें अशा यातनेंपासून मुक्त होऊन या जगांत राहिला होतास ? किं हे भाग्यशाली कङ्काल ! तुझ्या सुप्रसन्न अदृष्टांत ही यमयंत्रणाच नव्हती ? सांग तर मला काय केल्यानें मानवी यमयंत्रणेपासून मुक्त होतो ? हे बंधो ! बोल ! ज्याला स्त्रीवर्ग घृणित झालेला आहे असा एखादा जीव तूं पाहिला होतास का ? हे सर्वदर्शी ! अधरामृतपानाच्या लालसेपेक्षां अधिक विषारी वस्तू तुला दुसरी एखादी आढळली होती का ? नारीच्या प्रेमासारखा असार, क्षणस्थायी असा दुसरा एखादा पदार्थ या जगांत आहे का ? हे निर्वाक् ! मी तुझ्या पायां पडतों. एकवार अशा विपदांत पडलेल्या मनुष्याच्या क्लेश निवारणार्थ थोडा फार उपदेश कर. मरण्यांत काय सुख आहे तें सांग. बोल, मेल्यावर काय होतां येतें ? जर कांहीं होत नसेल तर हे सुहृद ! मला आपला साथी बनीव. मला आपल्या अवस्थेंत खेंचून ने. हे प्रेत ! हे भ्रयानक ! हे अवशेष ! मी आज तुझ्या अवस्थेप्रत पोंहचून संसाराची उपेक्षा करावयाची इच्छा धरितों. तुझ्यासारखें रूपांतर ग्रहण करून मानवहृदयाची दुर्बलता आणि कातरता पाहून हंसण्याची अभिलाषा बाळगितों. तुझी संपर्कशून्य सामग्री असतांही निस्तब्ध भावानें अविलिप्त अवस्थेंत मानवी मनाच्या गर्तांचें पर्य्यवेक्षण करण्याची आशा करितों. हे अतीत ! मला तुझे अवस्थेप्रत पोंहचण्याचा उपाय दाखीव. मला तुझा जोडीदार बनीव."

बोलतां बोलतां योगेंद्र खुर्चीवरून उठून त्या कङ्कालापाशीं गेला; व म्हणाला, हे निर्दय ! मला आपला साथी बनवण्याचा उपाय दाखीव. मी तुझे पायां पडतों पण मला मरावयाचा उपाय दाखीव."

योगेंद्रानें व्यग्रतेनें कङ्कालाचे हात धरिले. कङ्कालाचा खट् खट् असा शब्द झाला. त्यासरशीं योगेंद्र भानावर आला. हताश होऊन तो खुर्चीवर पुनः बसला.

हळुहळू सूर्यनारायण पूर्वदिक्भागीं उदित झाला. उषासंमोहनसमीर जगताला नूतन जीवन अर्पूं लागला. यावेळीं एक व्यक्ति त्या खोलींत शिरली. ही व्यक्ति म्हणजे सुरेश होय. योगेंद्रानें त्याला पाहून त्याचा हात धरून म्हटलें, "भाई ! तूं सांगितलेंस तेंच शेवटीं अनुभवाला आलें. बाबारे सर्व अनर्थांचें मूळ स्त्रियाच आहेत हें आतां मात्र मला पुरतें—पुरतें—पटलें."

सुरेश योगेंद्राकडे पहात चपापून आश्चर्यानें म्हणाला, "काय ?"

# द्वादश परिच्छेद.



## प्रेमपुरस्कार.





एक दिवस, दोन दिवस, तीन दिवस म्हणतां म्हणतां पंधरा दिवस लोटले. विनोदिनी अद्यापिही आपल्याच दुःखांत चूर आहे. कमलिनी व माधी आल्या आहेत. पण त्यांच्या गोष्टी ऐकून सरलहृदयी विनोदिनीचें हृदय विदीर्ण झालेलें आहे. त्या दोघींनीं खोटींनाटीं प्रमाणें दाखवून योगेंद्रनाथाच्या अंगीं जो नसता कलंक लाविला होता, तो खराच असावा असें विनोदिनीला आतां वाटूं लागलें. योगेंद्रनाथाला जी विनोदिनी हा वेळ पर्यंत निष्कलंक समजत होती, तोच आज आपला राहिला नाहीं अशी तिची ठाम समजूत झाली. याहून आणखी अधिक तें कोणतें दुःख ?

आज योगेंद्रही आला आहे. पण विनोदला त्याचें काय ? यावेळीं तर तो विनोदचा कोणीही नव्हता–तो दुसऱ्याचें धनसर्वस्व–होऊन चुकला होता. योगेंद्र वीरग्रामास आला खरा; पण घरीं कांहीं नाहीं. त्यानें आतां घरीं तरी कां म्हणून यावें ? घरीं त्याचें असें कोण आहे ? कोण म्हणजे ? विनोदिनी ! छे, छे, योगेंद्राचें तें पूर्वीचें गोड स्वप्न आतां लयाला गेलें आहे. त्याच्या हृदयकुसुमांत संशय-भुजंगानें ठाणें दिलें होतें. त्याचा चंदन-तरु आज विषवृक्ष बनला होता. मग कां म्हणून त्यानें घरीं यावें ?

संध्या झाली. विनोदिनी मलिन वेष धारण करून भूमीवर बसून रडत होती. ती विचार करूं लागली, " सदसद्विचार बुद्धि आजच का जगांतून लुप्त झाली ? हे गुणधाम ! कोणत्या पापामुळें माझ्या नशिबीं हें असह्य दुःख भोगण्याचें आलें ? कोणत्या दोषानें ही हतभागिनी आपली अपराधिनी झाली ? जर माझे हातून कांहीं चुकून अपराध घडला असेल, तर हे नाथ ! मला क्षमा करावी. पुनः मी तसें केव्हांही करणार नाहीं. हृदयेश ! जगतांत आपणांसारखे न्यायपरायण आढळणें दुर्मिळ ! असें असतां माझ्या दुर्दैवानें

आज आपली ती न्यायपरायणता कोठें बरं गेली ? आपली चरणधूलीही धारण करण्या-इतकी या दासीच्या आंगीं पात्रता नाहीं हें सुद्धां मी जाणत्यें; या क्षुद्र सेविकेचा आपण परित्याग केला हें ठीकच केलं. आपला विरह सुद्धां कसा बसा सहन करतां येईल, पण हे नाथ ! आपणांला हा कलंक लागलेला पाहून माझ्यानं कसं बरं जिवंत रहावेल ? लोक आपली निंदा करतील तें कसं बरं माझ्यानं पहावेल ? योगेंद्रनाथ ! आपण माझें हृदय-रत्न ! माझे देव ! ! माझे प्रभु ! ! ! असें असून आज आपण पतित, भ्रष्ट सामान्य मनुष्यांप्रमाणें कसे हो अनीतीच्या मार्गाकडे वळलां ? आपला हा कलंक—प्राणेश्वर ! आपलं हें अधःपतन पाहून ही अभागिनी राहील का आतां जिवंत ?

विशुद्धहृदयी विनोदिनी अशा प्रकारें पुष्कळ वेळ रडली. ती पुनः आत्मगत बोलूं लागली, " माझं नांव घेण्याचं जरी आपण टाकलं तरी जन्मजन्मांतरींचे माझे हृदयदेव आपणच अहां; आपण या चंडाळणीचें मुखावलोकन करा अगर नका करूं, पण मी मात्र जेव्हां आपण घरीं याल, तेव्हां आडून आपलं हृदयहारि मुखकमल अवश्य पाहणार.

विनोदिनी या प्रमाणें विलाप करीत आपल्या अश्रुधारांनीं पृथ्वीला सचैल स्नान घालीत होती, इतक्यांत हरगोविंद बाबु त्या खोलींत आले. या वेळीं रात्रीचे दहा वाजले होते. हरगोविंद बाबू म्हणाले, " कां बाळ ! असं रडून काय होणार ? "

विनोदिनीनें उठून विचारिलें, " आपण केला का कांहीं तपास ? "

" अजून पावेतों तर कांहीं शोध लागला नाहीं. "

विनोदिनी विषण्ण स्वरानें म्हणाली, " तर मग मला रडण्याशिवाय आतां गति कोणती ? "

" बाळे ! रडून काय उपयोग होणार आहे ? रडण्याला बहुत वेळ अद्यापि आहे. यावेळीं परामर्ष करणेंच उचित आहे. "

" कोणत्या रीतीनें ? "

" योगेंद्रनाथांना मी भेटावयास गेलों होतों, पण आपली प्रकृति नादुरुस्त आहे या सबबीवर त्यांनीं माझी भेट घेण्याचें टाळलें. यामुळें मला मोठा विस्मय वाटत आहे; यावरून योगेंद्र संसारापासून विरक्त झालेले असावेत असा माझा समज होतो. म्हणून कदाचित् परम आत्मीयाची भेट घेण्यास सुद्धां ते तयार नाहींत. "

" मग आतां कसं करावं ? "

" मी पुनः कसेंहि करून उद्यां त्यांची भेट घेईन म्हणतों. "

" नंतर ? "

" नंतर त्यांस तुझ्याकडे घेऊन येईन. त्यांचें वर्तन बिघडलें हें मला खरें वाटत नाहीं. त्यांच्या मनांत जरूर कांहीं तरी खळबळ उडाली असली पाहिजे. मी काय तें युक्ति-प्रयुक्तीनें त्यांजकडून काढून त्यांची समजूत करीन आणि विस्कटलेली घडी पुनः नीट बसवीन. "

आशा, आनंद आणि यंत्रणा या त्रयीमुळें विनोदिनीच्या हृदयांत एक अनिर्वचनीय भाव उद्भवला. ती रडत रडत मास्तरमहाशयांच्या पायांवर डोकें ठेवून म्हणाली, " मग मोठीच कृपा होईल या अभागिनीवर. तसं घडून आलं तर मला आपण नवीन जीवन दिल्यासारखं होईल. माझं आपण आतां रक्षण करा. आतां नाहीं माझ्यानें अधिक यातना सहन करवत. "

हरगोविंद बाबू विनोदिनीचा हात धरून म्हणाले, " मुली ! एवढी कातर नको होऊंस; या संसारांत मला स्त्री नाहीं, पुत्र नाहीं, कन्या नाहीं; मी तुला कन्येहूनहि जास्त समजतों. बाळ ! तुझ्या डोळ्यांत अश्रु पाहिले म्हणजे मलाहि भारी कष्ट होतात. शांत हो, मुली ! भय कशाचें आलें आहे ? "

इतकें बोलून वात्सल्यभावानें हरगोविंद बाबू तिचे डोळे पुसूं लागले.

ज्या वेळीं घरांत हा प्रकार चालला होता त्या वेळीं एक मनुष्य बाहेरून हा सर्व आंतील प्रकार पहात होता; पण विनोदिनी व हरगोविंद बाबू यांचा झालेला संवाद कांहीं त्याला ऐकूं गेला नव्हता. तो मनुष्य म्हणजे योगेंद्र ! दांत ओंठ चावून तो आत्मगत म्हणाला, " आतां काय ? सगळें पुरें वाटोळें झालें. "

हरगोविंद बाबू म्हणाले, " मुली ! मी आतां जातों. उद्यां जें काय घडेल तें मी तुझ्या कानांवर घालीनच. "

इतकें बोलून मास्तरमहाशय निघून गेले. विनोदिनीहि त्यांचे मागून हळू हळू चालली. पण जेव्हां ती जिन्याजवळ आली, तेव्हां समोरून कोणी येत आहे असें तीस दिसून आलें. तो योगेंद्र असें जेव्हां तिनें ओळखलें तेव्हां तिला परमानंद झाला. एकवार

घट्ट चरण धरून मनसोक्त रुदन करून हृदयस्थ भार हलका करावा असा तिनें विचार केला. म्हणूनच ती जिन्याच्या कठड्यास धरून राहिली. योगेंद्रानें जवळ येऊन पाहिलें तों ती विनोदिनी ! त्यासरशीं त्याचें सर्वांग कंपित झालें; हृदय विचलित झालें !

विनोदिनी यावेळीं आल्हाद, शोक, आशा, नैराश्य यांमुळें अगदीं अवसन्न झाली होती. संज्ञाहीनासारखी रडत रडत ' हृदयेश ! ' एवढाच शब्द उच्चारून ती योगेंद्राच्या चरणांवर पडली. त्यासरशीं " चल-हो दूर कुलटे ! आजपासून तूं माझी कोणी नाहींस व मी तुझा कोणी नाहीं " इतकें बोलून व जोरानें तिला लाथेनें दूर ढकलून योगेंद्र आंत गेला. विनोदिनी तेथेंच मूर्च्छित होऊन पडली. जेव्हां ती सावध झाली तेव्हां कपाळावर हात मारून म्हणाली, " आतां मरण्याचा उपाय कोणता योजावा ? "



# त्रयोदश परिच्छेद.

## साहस.





रा त्रीचा एक वाजला होता. योगेंद्रनाथ झोंपला नव्हता–त्याला मुळीं झोंप घेण्याची इच्छाच नव्हती. तो खोलींतच इकडून तिकडे फिरूं लागला. खोलींत दिव्याचा प्रकाश चांगला पडला होता. त्या प्रकाशांत योगेंद्रनाथाची छाया एकदां पूर्वेकडील भिंतीवर तर एकदां पश्चिमेकडील भिंतीवर पडत होती. त्याच्या चित्ताची अवस्था भयानक, संकल्पशून्य व उन्मत्ताप्रमाणें अव्यवस्थित झाली होती. जेव्हां मन उत्ताल भवसागरांत गोते खात असतें, तेव्हां संकल्पाचा किनारा मिळतो कीं काय ? तसेंही होऊं शकेल ह्मण, पण शांति पाहिजे ना ? पण या वेळीं शांति कोठून असावयाची ? रात्रौ योगेंद्रानें भोजन वगैरे कांहीं केलें नाहीं. बोलावल्या शिवाय आपल्या खोलींत कोणीही येतां कामा नये, असा त्यानें सर्व नोकरांस हुकूम फर्माविला होता. त्याची अवज्ञा करण्याची त्यांची मुळींच प्राज्ञा नव्हती.

दुसऱ्या खोलींत एक दुःखित कामिनी रडत बसली होती. ती कामिनी विनोदिनी ! त्या खोलींत मंद दीपप्रकाश पडला होता. त्या प्रकाशांत एकांतांत बसून मर्मपीडिता, सरलस्वभावा विनोदिनी पदरानें तोंड झांकून रडत होती. विनोदिनी आत्मगत विचार करूं लागली, " आतां हा प्राण कशासाठीं ? मी ज्यांची आहें त्यांचीच जर मजवर प्रीति नाहीं तर जगून माझा काय उपयोग ? हे दीनबंधो ! कां ह्मणून तूं या क्षुद्र रमणीस अतुल प्रेमसागरांत बुडविलेंस ? मी किती तरी रत्नप्रवाल पाहिले, पण त्यांपैकीं एकहि घेऊं शकलें नाहीं. हे प्रभो ! कां ह्मणून तूं मला आपलें अतुल भाण्डार दाखविलेंस ? अन् दाखविल्या नंतर कां बरं मला उपभोग घेऊं दिलास नाहींस ? कां ह्मणून मला तिथं थांबूं दिलं नाहींस ? कां ह्मणून असं मला दूर लोटलेंस ? दयामय ! कां ह्मणून मला तूं असा लोभ दाखविलास ? माझ्या हृदयांत हा कशाचा वणवा पेटला आहे ? पुढं असं होणार हें जर तुला सारं ठाऊक होतं, तर कां ह्मणून तूं असं केलंस ? हे अनाथनाथ ! हें रत्न कण्ठांत धारण

करून अद्यापि एक क्षणही झाला नसेल; अजूनही त्याच्या उज्ज्वल ज्योतीनें माझे नयन-माझें मन—चंचल झालेलं आहे; अजूनही मी पुरतं तें नीट पाहिलं सुद्धां नाहीं. असें असून हे जगदीश ! कां ह्मणून तूं तें माझ्या कंठांतून उतरून घेतलेंस ? ”

विनोदिनी वस्त्राचा पदर तोंडावर घेऊन जास्त जास्त रडूं लागली. बऱ्याच वेळानें ती पुनः आपल्याशींच म्हणाली, “ दयामय ! तुझ्या मनास जें योग्य वाटलं तेंच तूं केलंस; आतां एवढंच आणखी कर कीं, ज्यामुळें मी अनायासें ही पृथ्वी सोडून जाईन नी या अभागिनीचें मुख पुनः कांहीं कुणाच्या दृष्टीला पडायचं नाहीं. ”

विनोदिनी आतां विचार करूं लागली, “ केव्हांनां केव्हां मेलं तर पाहिजेच, पण तत्पूर्वी एकवार नाहीं का तिकडची दृष्टिभेट घेतां यायची ? ”

क्षणभरानें विनोदिनी हळूहळू उठून उभी राहिली. नंतर तिनें ‘ गुणो !—गुणो ’ अशी हलक्या आवाजांत हांक मारिली.

दासी गुणो या वेळीं अगदीं गाढ झोपेंत होती. तेव्हां हांकेस कांहीं ‘ ओ ’ मिळाला नाहीं. त्यानंतर विनोदिनीनें मोठ्या सावधगिरीनें दरवाजा उघडला. नंतर विव्हलचित्त होऊन ती क्षणभर कसलासा विचार करूं लागली. त्यानंतर निश्चयात्मक स्वरांत ती पुटपुटली,

“ भय कशाचें आतां ? ते तर मला नाहींना पाहूं शकणार ? मग भ्यावें काय म्हणून ? ”

हळूहळू विनोदिनी घराबाहेर पडून आंगणांत आली; आणि ज्या खोलींत योगेंद्र होता त्या खोलीच्या खिडकीकडे पाहूं लागली. पहातां पहातां तिची सुकोमल देहलता कांपूं लागली. ती विगलित झाली. त्या धूलिमय प्राङ्गणांत बसून दुःखिनी विनोदिनी विचार करूं लागली, “ हृदयेशा ! तुम्हीही तेच, मी ही तीच, पण आज दोन्ही एकमेकांस परकी झालेलों आहोंत; आपलं नांव ऐकून जी पूर्वी नाचत असे, तीच मी आज आपली भेट घ्यावयास सुद्धां भीत आहें; भय, मानापमान, आदर कशाचा ! नाथ ! आपणांपुढें मला सर्व सारखंच ! आपला संतोष हेंच माझें जीवनव्रत ! म्हणूनच माझ्या आगमनानें आपण असंतुष्ट व्हाल हीच मला मोठी भीति पडली आहे. पूर्वीप्रमाणें मी आपला आनंद-प्रदीप नसून उलट क्लेशास कारण झालेली आहें. प्राणनाथ ! म्हणून तर आतां प्राण न ठेवण्याचा मी निर्धार केलेला आहे. माझें जीवनव्रतच जर संपलें तर आतां जगून काय उपयोगाचं ? ”

विनोदिनी उठून उभी राहिली. नंतर हलक्या पावलांनीं ती पुढें सरकली आणि पडवींत आली. आणखी एक पाऊल पुढें टाकिलें कीं, योगेंद्र दृष्टीस पडणार या विचारानें ती स्वतःशींच पुटपुटली, "ज्यांचा वियोग मला पळभरहि सहन होत नसे, त्यांच्याशींच आज छत्तीसाचा आंकडा असावाना? त्यांनां पहावयासाठीं मला असें लपून छपून यावें लागत आहेना?"

साहस करून विनोदिनीनें एक पाऊल पुढें टाकलें. खिडकींतून डोकावून ती पाहूं लागली. तिनें पाहिलें, आपले हृदयदेव–योगेंद्र–तेथें आहेत. त्याच क्षणीं विनोदिनीच्या संज्ञेचा लोप झाला. खिडकीच्या गजाला धरून ती उभी राहिली. पण फार वेळ तिच्यानें तसेंहि करवलें नाहीं. ती भूमीवर पडली. पुष्कळ वेळानें तिचें मन कांहींसें स्थिर झाल्यावर विनोदिनी आपल्याशींच म्हणाली, "ही भेट आतां शेवटचीच आहे. आतां पुनरपि कांहीं आपली भेट व्हायची नाहीं. हृदयनाथ! मरण्याचें मला मुळींच भय वाटत नाहीं, पण शेवटच्या घटकेस आपणांशीं दोन सुखदुःखाच्या गोष्टी बोलाव्यात इतकीच दासीची इच्छा आहे. पण त्यापासूनही आपणांस कष्ट होतील म्हणून मी माझी ती इच्छा एकीकडे गुंडाळून ठेवीत आहें. प्राणेश्वर! जन्मोजन्मीं आपल्याच चरणांपाशीं दासीला स्थान मिळावें एवढीच मनीषा आहे."

विनोदिनी आतां उठून उभी राहिली आणि खिडकींतून पाहूं लागली. आपल्या हृदयदेवतेस—योगेंद्रास—पाहून ती पुनः आपल्याशींच पुटपुटूं लागली, "भगवन्! आपणच जगतांतील अतुलनीय रत्न! आपण निष्ठुर अहां असं कोण बरं म्हणेल? इच्छामय! एके दिवशीं हें रत्न मी मस्तकावर धारण केलें होतें, ही थोडी का समाधानाची गोष्ट आहे? दुःखिनीची या जन्मांतील सगळी आशा पूर्ण झाली आहे. जगदीश! तुझ्या चरणीं या मंदभगिनीची एवढीच शेष प्रार्थना आहे कीं, जन्मोजन्मीं मला यांच्याच चरणांशीं आश्रय मिळावा."

योगेंद्रहि या वेळीं आपल्या अस्थिर चित्तास शांत करण्याच्या हेतूनें पडवींत आला. विनोदिनी तेथून जवळच होती. एकवार विनोदिनीला वाटलें कीं, पतीच्या पायांवर घालून घ्यावें आणि एक दोन गोष्टी बोलाव्यात. पुनः तिला विचार पडला कीं, 'योगेंद्र आपलें नांवही काढीत नाहीं; मग मुद्दाम म्हणून बोलावें कसें? मला पाहून तिकडे उलट कष्ट मात्र व्हावयाचे. छे, आतां त्यांनां मी मुळींच कष्ट द्यावयाची नाहीं. पुनः ती विचार करूं

लागे, 'कां बरं जिवंत असेपर्यंत मी याच जागीं बसूं नये ? हें सुख कां म्हणून मी सोडावें ? ' पुनः आपल्याशींच म्हणे, " तिकडून आपोआपच होईल मला पहाणं. छट्, हा लोभ सोडणें बरें नव्हे. "

नंतर विनोदिनी हात जोडून वर नजर करून म्हणाली, " हे अनाथनाथ ! हे इच्छामय ! माझ्या जीवनलीलानाटकाची समाप्ति तर होत आलेलीच आहे. माझं सुखदुःख आतां लवकर संपेल; पण हे दयामय ! ही व्यक्ति—या दुःखिनीचें सर्वस्व धन, अभागिनीचें जीवनसर्वस्व आहे. इकडच्या पायांत चुकूनसुद्धां एखादा कंटक रुतूं नये, इकडच्या सुखांत केव्हांहि कमतरता पडूं नये हीच एक माझी तुला हात जोडून सविनय प्रार्थना आहे. हे जगदीश ! जी दुःखिनी तुझ्या शांतिमय चरणांजवळ आश्रय घेणार आहे, तिच्या या प्रार्थनेची अवहेलना तुजकडून होणार नाहीं अशी आशा आहे. "

पुनः योगेंद्राकडे पाहून भक्तिपूर्वक ती पुटपुटली, " हृदयेश ! आपण सुखानें रहा. या अभागिनीचें नांव घेऊन केव्हांहि अनुताप करूं नका. मी आपल्या कर्माचें फल भोगीत आहें यांत आपला कसचा दोष ? जन्मजन्मांतरीं मला हेच पाय लाभोत. "

यावेळीं योगेंद्र खोलींत इकडून तिकडे फिरत होता. त्याच्याकडे पाहून पुनः विनोदिनी म्हणाली, " भ्रान्त मन ! तिकडची मूर्ति पाहून तुझी आशा का सफल होणार ? मग कां असें वारंवार ? "

अविरल अश्रुधारांनीं विनोदिनीचें वक्षःस्थल भिजून गेलें. उन्मादिनीसारखी ती तेथून मागें परतली व अस्थिरतेनें चालूं लागली. अंगणांत आल्यावर पुनः तिनें एकवार मागें वळून पाहिलें. पुनः तिला तीच मनोहर मूर्ति दृष्टीस पडली. तेव्हां अचानकपणें तिच्या तोंडून मर्मविदारक स्वरांत शब्द बाहेर पडला:—

" भगवन् ! "

हांक योगेंद्राला ऐकूं आली. विनोदिनीचा चिरपरिचित कंठस्वर त्यानें ओळखला. तो खिडकीकडे येऊन पाहूं लागला; पण यावेळीं विनोदिनी तेथून निघून गेली होती. योगेंद्राला कोणीही आढळलें नाहीं. हा सर्व आपल्याच अस्थिर मनाचा खेळ असावा असें त्यास वाटलें. त्यानें तिकडून आपली दृष्टि फिरविली.

---

# चतुर्दश परिच्छेद.



## प्रत्याख्यान.





योगेंद्रनाथास मुळींच चैन पडत नव्हतें. काय केल्यानें ही गुरुतर यातना शांत होईल, काय केल्यानें चित्ताचा हा असीम वेग शांत होईल, कोणत्या उपायानें या विश्वासघातकतेचा प्रतिशोध लागेल हें त्याला कुणी सांगेल का? या सर्व दुर्दमनीय व्याधींचें औषध देईल का कोणी वैद्य यास? आम्हांला तर वाटतें कीं, एक मृत्युच या सर्व व्याधींचें औषध आहे. या यंत्रणेंतून योगेंद्र कसा मुक्त होणार आहे किंवा मुक्त होण्यासाठीं त्यानें कोणते उपाय योजिले आहेत हें आम्ही जाणत नाहीं, तथापि या चिंतेची शांति चितेच्या अग्नीशिवाय शांत होणारी नाहीं हें मात्र नक्की! ज्या प्रतारणेच्या सागरांत तो बुडाला होता, त्यांतून बाहेर पडण्याचें सामर्थ्य त्याच्या आंगीं नव्हतें. विचित्र घटनांमुळें आतां अविश्वासरूपी अंधकार दूर होईलसें दिसत नव्हतें. ज्या उच्च स्थलीं तो चढून बसला होता तेथून पुनः खालीं येणें त्याच्या शक्तिपलीकडचें होतें. जों पर्यंत त्याच्या रक्तवाहिन्यांमधून तारुण्याचें रक्त सळसळत आहे तोंपर्यंत तरी या असह्य यातनाचा दुःखावेग कमी होईलसें दिसत नव्हतें. मृत्यूशिवाय असल्या अभागी प्राण्याचा दुसरा कोण योग्य परामर्श घेणार? दोघां ‘विषकुंभः पयोमुखं’ रमणींनीं स्वार्थानें प्रेरित होऊन मोठ्या चातुर्यानें त्याच्या शरीराच्या प्रत्येक भागांत विष ओतलेलें आहे. त्यामुळें विषारी सर्पांच्यानेंही करवलें नसतें इतकें त्याचें जीवन भयानक झालें होतें. त्याची निरोगी प्रकृति, शांत स्वभाव आणि प्रेममय जीवन या सर्वांस क्रोध, अविश्वास आणि घृणेच्या मादकतेनें अगदीं विकृत केलें होतें. त्याच्या सुहास्यवदन मंडलावर चिंतेची गाढ छाया दृग्गोचर होत होती. त्याच्या प्रफुल्ल ललाटक्षेत्रावर चिंतेच्या रेषा उमटल्या होत्या. त्याचे प्रशांत नयन आरक्त बनून गेले होते. आणि या सर्वांहून विशेष हें कीं, त्याला सारासार विचार करण्या इतकें भान नव्हतें-त्याची मनः-

स्थिति ताळ्यावर नव्हती. मग कां म्हणून–कोणत्या सुखाच्या आशेनें–त्यानें जगावें ? वाचकहो ! जरी लेखकाला तुम्ही निष्ठुर म्हटलें तरी पुरवलें; पण या भारभूत जीवितापेक्षां योगेंद्रानें मरणेंच श्रेयस्कर ! कदाचित् त्याचा असा समज नसेल ! विश्वासघातकी व्यक्तीस अगोदर शिक्षा करून मग स्वतः मरावें असाच त्यानें निर्धार केलेला दिसतो.

रात्रीचे तीन वाजून गेले होते. निद्रेच्या शक्तिप्रभावानें अंतर्बाह्य जगत् स्थिर होतें. पण योगेंद्राचें याच्या उलट होतें. तो अद्यापिही जागाच होता. आतां तो बिछान्यावर पडला. पण झोंप यावी या हेतूनें नव्हे, तर आपल्या मनास थोडी बहुत शांति मिळावी या हेतूनें. पण तसें कांहीं झालें नाहीं. तो पलंगावरून उठला आणि जवळील फडताळ उघडून त्यानें एक चकचकीत सुरा बाहेर काढिला. ज्या मेजावर दिवा पेटत होता त्याजवळच एक खुर्ची होती. योगेंद्र त्या खुर्चीवर जाऊन बसला. आवरणांतून त्यानें तो सुरा नग्न केला. उज्ज्वल प्रकाशांत तो सुरा चमकूं लागला. सुऱ्याच्या अचूक व तीक्ष्ण धारेची एक वार योगेंद्रानें परीक्षा पाहिली. मेजावर तो सुरा उभा खुपसून त्याच्या मुठीवर डोकें टेकून तो किंचित्काल विचारमग्न झाला. नंतर दीर्घ उसासा टाकून तो उठला आणि खोलींतच फिरूं लागला. पुनः येऊन त्यानें सुरा हातांत घेतला आणि त्याची धार तपासली. तो खुर्चीवर बसला आणि डोकें खाजवूं लागला. यानंतर–यानंतर त्यानें त्या सुऱ्याचें तीक्ष्ण टोंक आपल्या छातीस लाविलें. याचवेळीं मागच्या दरवाजानें कोणी एका सुंदरीनें द्रुत गतीनें येऊन त्याचे दोन्ही हात धरून घाबरून म्हटलें.

“ हें काय ?–हें काय ?–योगेंद्र ! हें काय ? ”

सुंदरीचा आवाज कांपत होता. तिच्या नेत्रांवाटे घळघळां अश्रू वाहत होते. योगेंद्रानें विस्मयचकित होऊन मागें वळून पाहिलें तों कमलिनी त्याच्या दृष्टीस पडली.

योगेंद्रानें कां म्हणून सुरा काढला होता व तो कां म्हणून आपल्या छातीवर ठेविला होता हें नीटसें आम्हींही सांगूं शकत नाहीं. तरी पण यावेळीं आत्महत्या करण्याची त्याच्या मनाची प्रवृत्ति नव्हती हें मात्र आम्ही सांगूं शकूं. आपलें हृद्गत कमलिनीजवळ यावेळीं उघड केल्यास तें आपल्या वासनापूर्तीच्या आड येईल अशा विचारानें योगेंद्रानें हंसून विचारिलें, “ एवढ्या रात्रीं तूं येथें कुठून ? ”

योगेंद्र हंसला. किती भयंकर ही गोष्ट ! ज्या व्यक्तीच्या अवस्थेची व यातनेची आलोचना करून आम्हांला तो मृत्युवश होईल असें वाटत होतें, तो पुनः हंसून बोलूं

लागला. सर्वांचें रोदन व हास्य सारखेंच का असतें ? अथवा योगेंद्रानें कदाचित् आपल्या क्केशराशीमधून असें एखादें सूक्ष्म रहस्य काढलें असेल कीं, जें आमच्यासारख्या क्षुद्र बुद्धीच्या माणसांच्या लक्षांत येणें कठीण आहे. कसेंही असो; तो हंसून म्हणाला.

" एवढ्या रात्रीची तूं येथें कशी ? "

कमलला वाटलें ' साधने मुळेंच सिद्धी होत असते ही कांहीं खोटी गोष्ट नाहीं. दारुण मनस्तापामुळें योगेंद्र आत्महत्येस प्रवृत्त झाले होते; तथापि मला पाहून ज्याअर्थीं ते क्षण-भर सर्व दुःखयंत्रणा विसरून गेले आहेत, त्याअर्थीं त्यांच्याही मनांत प्रेमाचें बीजारोपण झालेलें आहे खास ! म्हणूनच ते असे हंसून विचारित आहेत. एवढ्या दिवसा नंतर ईश्वरास माझी करुणा आलेली दिसते. जर प्रवाहस्रोत आपोआपच मागें वळला आहे तर वाऱ्याच्या योगानें नाव आपोआपच घाटावर लागेल ? नंतर एकवार योगेंद्राच्या मुखाकडे आपली विलासमयी दृष्टि फेंकून ती म्हणाली. " योगिन् ! तुह्मी काय असं मुला सारखं आरंभिलें आहे. एक बालिका--एका तुच्छ बालिकेसाठीं तुह्मी कां ह्मणून आत्मघातास तयार झालां ? "

योगेंद्रानें हंसून ह्मटलें, " त्या गोष्टीशीं काय प्रयोजन आहे ? मी एका तुच्छ बालिके साठीं आत्मघातास प्रवृत्त झालों हें तुला कोणी सांगितलें ? हरि ! हरि ! मला अजूनही पुष्कळ सुखें आहेत—आशा आहेत. असें असून मी कां ह्मणून जीव देण्यास उद्युक्त होईन ? "

कमलिनीनें ह्मटलें, " तर मग आपण सुरा घेऊन काय करीत होतां ? "

योगेंद्र ह्मणाला, " मी तो नुसता पहात होतों. माझ्या मनांत जर खरोखरीच मराव-याचेंच असतें तर मी केव्हांच मेलों असतों. पण माझी तशी इच्छा नाहीं. हा पहा मी सुराच फेंकून देतों मग तर झालें ? "

इतकें बोलून योगेंद्रानें हातांतील सुरा जोरानें दूर भिरकावून दिला. तेव्हां कमलिनी ह्मणाली " विनीच्या सर्व कांहीं गोष्टी माझ्या कानावर आल्या आहेत, कोणाच्या ध्यानीं मनींही नव्हतें अशाप्रकारचें दुष्कृत्य तिच्या हातून घडलेलें आहे. ज्याअर्थीं तुह्मांला हें सारं कळलं आहे त्याअर्थीं आतां छपवून तें काय ठेवणार ? परंतु योगेंद्र ! गतगोष्टीबद्दल विनाकारण दुःख करीत रहाणें आपणांस उचित नाहीं. आपलं अद्यापि वय आहे, देवानें

सुंदर भुवन मोहनरूप दिलेलें आहे, नी गुणही दुर्लभ आहेत. मग जगत् आपल्याला कां ह्मणून वश होणार नाहीं ? आपण जर मनांत आणाल, तर हजारों कामिनी आपल्या चरणाच्या दासी होतील. "

इतकें बोलून कमलिनीनें आपली आरक्त भेदक दृष्टि योगेंद्राकडे लाविली आणि एक तीव्र कटाक्षपात फेंकला. योगेंद्राला कमलिनीचा अंतस्थ गूढ हेतु समजला कीं नाहीं कोण जाणे ! पण त्यानें कमलिनीला उत्तर मात्र कांहीं दिलें नाहीं. उत्तराऐवजीं त्यानें एकवार स्मित केलें एवढेंच, कमलिनीच्या मनांत आशेचा संचार झाला. 'बुडत्याला काय काडीच्या आश्रय' म्हणताततना; त्यांतलीच ही गत म्हणावयाची ! योगेंद्राचें हृदय आतां विरघळूं लागलें आहे असें तीस वाटलें. पुन: किंचित् आवेशानें ती म्हणाली, " योगेंद्र ! हा संसार सुखासाठीं आहे. हजारों जरी दुःखें आलीं तरी कातर होणें हा पुरुषार्थ नव्हे ! जिकडे दुःख असेल तिकडे न जातां जिकडे सुख असेल तिकडे जावें. "

योगेंद्र म्हणाला, " माझें सुखदुःख मी आतां सर्वस्वीं तुझ्याच हातीं सोंपविलेलें आहे. तूं मला ज्या मार्गानें नेशील तोच मार्ग मी आतां पत्करीन. इतकें बोलून योगेंद्रानें पुन: स्मित केलें. कमलिनीच्या हृदयावर आतां पुरा आघात झाला. तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले. ती आपल्याशींच पुटपुटली, योगेंद्र आतां माझाच आहे. "

नंतर उघडपणें ती ह्मणाली, "योगेंद्र ! समजा एखाद्या व्यक्तीचें दुसरीवर प्रेम जडलें, पण ती दुसरी व्यक्तीहि आपल्यावर प्रेम करिते किंवा नाहीं हें ती जाणत नाहीं अथवा समाजाच्या भीतीनें ती आपली कष्टप्रद मानसिक व्यथा आंतल्या आंत दाबून ठेविते. अशा स्थितींत तिला काय काय यातना होत असतील याची आपण कल्पना करूं शकाल काय ? "

योगेंद्राला वाटलें, आपणाला वाटत असलेला तर्क आतां खराच होऊं पहात आहे. कमलिनीनें जी गोष्ट आजपर्यंत बोलून दाखविली नाहीं तीच आज ती उघड करून सांगणार आहे. मग ठीकच ! विधवा कमलिनीचा तिच्या इच्छेप्रमाणें पुनर्विवाह करून दिल्यास तिचेहि कष्ट दूर होतील व हातून एक प्रकारचें तिचें भलें केल्यासारखें होईल. तो ह्मणाला, " कमलिनी ! प्रेम पुष्कळ प्रकारचें असतें. प्रेम नरकाला स्वर्ग, पापाला पुण्य व दुःखाला सुख बनवितें किंवा याच्या उलट सारासार विचार, सदसद्विवेक बुद्धिही नष्ट करून टाकतें. मग बोल. तुझें प्रेम यांपैकीं कोणत्या तऱ्हेचें आहे ? "

कमलिनीचे नेत्र उज्ज्वल झाले. ती म्हणाली, “ माझ्या मनांत असलेलं प्रेम मी कोणत्या शब्दांनीं नी कसं व्यक्त करावें हेंच मुळीं मला कळत नाहीं. पण जगतांत तशा प्रकारचं प्रेम अन्य कुठंही आपणांस आढळणार नाहीं. हें मात्र ध्यानांत असूं द्या. ”

“ तसेंही असेल ” भोळा योगेंद्र म्हणाला, “ पण उभयपक्षीं तसें दृढ प्रेम आहे का ? ”

दीर्घ निःश्वास टाकून कमलिनीनें म्हटलें, “ हेंचि तर मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. हें ठाऊक नाहीं म्हणून तर या सर्व यातना भोगाव्या लागत आहेत. ”

सुंदरीनें लाजेनें मान खालीं घातली. योगेंद्रानें विचार केला, दारुण अव्यक्त प्रेमांत सांपडल्यामुळें कमलिनीला फार कष्ट होत आहेत. म्हणून तिचें समाधान करण्याच्या हेतूनें तो म्हणाला, “ दुसऱ्या व्यक्तीचेंही पहिलीवर तसेंच प्रेम असूंही शकेल कदाचित्. पण समाजाच्या भीतीनें तें व्यक्त करावयास तिलाही धीर होत नसेल. ”

उत्साहानें कमलिनी म्हणाली “ योगेंद्र ! काय असेंही असेल म्हणतां ? मग यास उपाय काय ? ”

योगेंद्रानें म्हटलें, “ उपाय हाच कीं, प्रथमतः त्या व्यक्तीच्या हृदयाची परिक्षा केली पाहिजे. ती व्यक्ति स्वभावानें भली आहे किंवा नाहीं हें प्रथमतः पाहिलें पाहिजे. ”

“ ती व्यक्ति अहाहा ! योगेंद्र ! मानवी नाहीं. खचित ती-ती स्वर्गीय देवताच आहे. ”

योगेंद्र खुर्चीवरून उठला आणि कांहीं वेळ विचार करीत इकडे तिकडे फिरूं लागला. नंतर तो कमलिनीच्या समोर येऊन तिला म्हणाला, “ तर मग त्या व्यक्तीच्या कानावर ही गोष्ट घालणें अयोग्य होणार नाहीं. ”

योगेंद्र पुनः खोलींत फिरूं लागला. कमलिनीहि कोण जाणे कसल्याशा विचारांत अगदीं मग्न झाली. नंतर योगेंद्राच्या पायांवर घालून घेऊन ती म्हणाली, “ योगेंद्र ! व्यक्ति दुसरी तिसरी कोणी नसून आपणच ! हृदयदेव ! आपणच माझी ती आराध्य देवता ! मी सर्वस्वीं आपलीच आहें. ”

कमलिनीच्यानें अधिक कांहीं बोलवलें नाहीं.

यावेळीं मंद भागिनी सर्व नाश साधिनी, प्रेमाभिभूता, सौंदर्यलतिका कमलिनी योगेंद्राचे चरण घट्ट धरून राहिली होती. तिच्या तोंडचे वरील शब्द ऐकतांच योगेंद्र चपापला.

दुसरा कोणता प्रसंग असता तरी सुद्धां योगेंद्र एवढा घाबरता ना; भिंतीवर हात टेंकून त्यानें सर्व गोष्टींचा सूक्ष्मपणें विचार केला. कमलिनिच्या डोळ्यांतील उष्ण अश्रुबिंदु यावेळीं योगेंद्राचे चरण भिजवीत होते. बऱ्याच वेळानें कमलिनीला योगेंद्र गंभीर स्वरांत म्हणाला, " कमलिनी ! जा; तुझें प्रेम अस्थानीं आहे. तुझी ही आशा केव्हांही सफल होणें नाहीं. हृदयाला शांत करण्याचा अभ्यास कर. आणि सोड आतां माझे पाय."

पण कमलिनीनें त्याचे पाय सोडले नाहींत, तेव्हां योगेंद्रानें आपल्या हातानें ते सोडविण्याचा प्रयत्न केला. पण काय चमत्कार ! त्यानें पाहिलें; " कमलिनी अगदीं बेभान झाली आहे."

मोठ्या प्रयासानें आपले पाय सोडवून योगेंद्र आपल्या मनाशींच विचार करूं लागला कीं, हिची ही मूर्च्छा चिरस्थायी झाल्यास फारच उत्तम होणार आहे. पण या जन्मांत आणखीही तिच्या कांहीं आशा नसतील कशावरून ?

तो पाणी नेऊन तिच्या डोळ्यांस लावणार तों ती आपोआपच सावध झाली. तेव्हां योगेंद्र जाऊन दूर एका कोंचावर बसला. कमलिनीनें उठून एक दीर्घ निःश्वास टाकला. क्षणभरानें ती त्या खोलींतून निघून गेली.

बाहेर दुसरी एक स्त्री तिची मार्गप्रतिक्षा करीत होती. ती स्त्री माधी ! तिच्याजवळ येऊन कमलिनी म्हणाली, " माधी ! आशा तर सोडून चाललीच मग जगायचं कां म्हणून बाई ? "

" ताईसाहेब ! भितां कां अशा ? " माधीनें धीर देत म्हटलें, " ही माधी जिवंत असेपर्यंत आशा कां म्हणून सोडायची ? "

" पण आतां उपाय ? "

" आहे. याला एक अंतिम उपाय आहे. तो मी उद्यां आपणांस सांगेन." माधीनें तिचा हात धरून तिला आपल्याबरोबर नेलें.

# पंचदश परिच्छेद.

## मीलन महोत्सव.



प्रातःकालच्या सुमारास योगेंद्र घराजवळील राजपथावर शून्य दृष्टीनें फिरत होता. गेल्या रात्रीं त्यास झोंप कशीती मुळींच लागली नव्हती. त्यामुळें जाग्रण झाल्याकारणानें त्याचे नेत्र आरक्त झाले होते. शरीर बलहीन आणि क्षीण झालें होतें. चेहरा साफ उतरून गेला होता. तो आपल्याशींच पुटपुटूं लागला, "केवढी ही भयंकर गोष्ट! हर गोविंदाचा मी आतां खूनच करणार. पण त्याचा कांम्हणून ? विनीच विश्वासघातिनी आहे. तिचाच खून केला पाहिजे." पुनः तो विचार करूं लागे, "जर मानवी रक्तानेंच हात भरावयाचे आहेत तर दोघांनाही कां बरें मारूं नये ?" क्षणभरानें पुनः कांहीं विचार येऊन तो म्हणे, "तीं दोघेंही पातकी असतील, पण त्यांस शिक्षा करण्याचा मला काय अधिकार ? मी कां म्हणून उगाच कलंकित होऊं ? मीच या जगांतून आपलें कां काळें करूं नये ? या संसारांत मला तर आतां कोणत्याही प्रकारचें सुख उरलेलें नाहीं. असें असतां आणखी नरहत्या करून खुनी या दर्जास कां म्हणून पात्र होऊं ? पण ही यातना दूर व्हावी कशी ? संसाराचा त्याग करतां येईलच म्हणा, पण स्मृति नष्ट होणें शक्य नाहीं यास काय उपाय ? मला वाटतें मृत्यु ! मग छट्, मी मरणार नाहीं. मेल्यानें सुद्धां ही आग विझायची नाहीं." पुनः क्षणावकाशानें तो स्वतःशींच बोले, "नाहीं मला मेलेंच पाहिजे पण मला जी चिंता आहे–ती–ती गोष्टच आतां हवी कशाला ? मला धोका देण्यासाठीं ती परक्याची झाली. अरेरे ! नाहीं ! ! कधींही नाहीं ! ! ही चिंता मेल्यावर सुद्धां माझा पिच्छा पुरविणार."

"नाहीं. हें होणार नाहीं. हीं दोघें जिवंत असतांना मी मेल्यास कांहीं फायदेशीर नाहीं, त्यांस ठार केल्याविना मी मरावयाचा नाहीं. मग कितीहि विघ्नें येवोत ! आजच दोघां–दोघांसही ठार करणार ! ! विलंब करणें आतां इष्ट नाहीं."

विचार करितां करितां आधींच लाल असलेले योगेंद्राचे नेत्र अधिकच लाल झाले. त्याचें मस्तक भ्रमूं लागलें व शरीरावर रोमांच थरारले. हत्या, मृत्यु, पापादि प्रवृत्तिगण त्याच्या सभोंवार थय् थय् नृत्य करूं लागला. जणुं काय आपल्या हातांत कोणी तरवार दिली आहे व त्या अदृश्य भयानक देहहीन आकृति खदखदां हांसून विनोदिनी आणि हरगोविंदाचा खून करावयास त्यास प्रोत्साहन देत आहेत असे त्यास वाटलें.

योगेंद्र याप्रमाणें उन्मत्तासारखे चाळे करीत असतां एका मनुष्यानें त्याच्याजवळ येऊन त्यास हांक मारिली, " योगेंद्र ! "

उत्तर मिळालें नाहीं.

आगांतुकानें पुनः हांक मारिली, " योगेंद्र ! "

योगेंद्र आतां आपल्या विचार लहरींतून जागृत झाला. त्यानें हांक मारणाराकडे पाहिलें तों ते हरगोविंदबाबू आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. योगेंद्राची दशा पाहून हरगोविंदबाबूंच्या मनांत भडभडून आलें. योगेंद्रानें कांहींच जबाब दिला नाहीं. हें पाहून हरगोविंदबाबू पुनः म्हणाले, " हें काय योगींद्र ! तुमची ही दशा कशानें ? "

यावेळीं वेड्यासारखा टक लावून योगेंद्र हरगोविंदबाबूंच्या चेहऱ्याकडे पाहूं लागला. नंतर उच्च स्वरांत क्रोधानें योगेंद्र म्हणाला, " जा, चालता हो माझ्या डोळ्यासमोरून आणि मरावयासाठीं तयार हो ! कुलटा विनोदिनीलासुद्धां हेंच जाऊन सांग. जा लवकर."

हरगोविंदबाबूंच्या आंगावर शहारे आले. ते म्हणाले, " छट्, छट्, योगेंद्र ! काय हें असें आपण वेड्यासारखें म्हणतां ? विनोदिनीवर अशा प्रकारचा भयंकर आरोप ठेवणें शोभलें तरी कसें आपणांला ? "

योगेंद्र चिरडीस येऊन म्हणाला, " चल नीघ माझ्या डोळ्यासमोरून; आणि हें बघ तुझा मृत्यु कांहीं आतां फार लांब नाहीं. हें सुद्धां नीट ध्यानांत ठेव. "

हरगोविंदबाबू मोठ्या विचारांत पडले. योगेंद्र आज असा काय वेड्यासारखें करीत आहे याचा कांहीं केल्या त्यास उमज पडेना. विनोदिनीच्या वर्तनाविषयीं याचें मन साशंक झालें आहे असें जरी गृहीत धरिलें तरी याचा निष्कारण माझ्यावर राग कां ? आतां याच्याशीं कमी जास्त बोलणें रास्त नाहीं; असा विचार करून जातां जातां ते म्हणाले, " मी आपणांस एक गोष्ट विचारण्यास आलों होतों; पण ती ऐकून घ्यावयाचें आपल्या मनांत नसल्यास माझें कांहीं म्हणणें नाहीं; पण हीं पत्रें तरी वाचून पहाण्याची जरा घ्याल का तसदी ? "

इतकें बोलून कमलिनीनें विनोदिनीस–लिहिलेल्या पत्रांचें पुडकें त्यांनीं त्याच्या हातांत दिलें. योगेंद्रानें तें पुडकें घेऊन रागानें दूर भिरकावून दिलें. आतां या ठिकाणीं जास्त वेळ उभें रहाण्यांत अर्थ नाहीं असें समजून हरगोविंदबाबू तेथून निघून गेले. पण योगेंद्र खास वेडा झाला आहे; त्याशिवाय तो असें अद्वातद्वा कांहीं तरी बडबडत सुटता ना. अशा स्थितींत त्यास सोडूनही जातां उपयोगाचें नाहीं व त्याच्या जवळ राहिल्यास तो अगदीं चिडून एखादे वेळीं हमरीवर यावयाचा; त्यापेक्षां त्याच्या डोळ्यासमोर न उभें रहातां जवळपासच कोठें तरी असावें असा पोक्त विचार त्यांनीं केला. योगेंद्रानें त्यांच्याकडे ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं.

योगेंद्र जेथें उभा होता त्याच्याजवळच एक दगडी तट होता. त्या तटाच्या आड राहून तो काय काय करतो तें सारें हरगोविंदबाबू पाहूं लागले.

बऱ्याच वेळानें योगेंद्रानें आसपास पाहिलें तों पथ जनशून्य दिसला. हें पाहून उगाच तो इकडे तिकडे येरझारा घालूं लागला. जेथें त्या पत्रांचें पुडकें पडलें होतें तेथून तो दहा बारांदा फिरकला असेल. आतां तो त्याविषयीं आपल्याशींच विचार करूं लागला, " हीं पत्रें मी कां बरें वाचलीं नाहींत ? कदाचित् यांत विनोदिनीसंबंधीं कांहीं लिहिलेलें असेल. अथवा हीं वाचल्यापासून कोणावर उपकारही करतां येतील कदाचित् ! न वाचल्यास संभवनीय आहे, एखाद्याचें अनिष्ट ही होण्यासारखें असेल. "

तें पत्रांचें पुडकें हातांत घेऊन वाचूं कीं नको याचा तो आतां विचार करूं लागला. बऱ्याच वेळानें त्यानें तें पुडकें उघडून पाहिलें; त्या सरशीं एका पत्रावरील चिरपरिचित अक्षर पहातांच तो चपापला. हीं पत्रें कमलिनीच्या हातचीं लिहिलेलीं होतीं. तो त्यांपैकीं एक वाचूं लागला:—

" विनोदिनी !

मी कलकत्त्यास आल्यावर योगेंद्रांना भेटावयास गेल्यें होत्यें; पण त्यांची भेट कांहीं झाली नाहीं. त्यांचे बिऱ्हाडीं असलेल्या एका दासीशीं माझें थोडें बोलणें चालणें झालें. त्यावरून यावेळीं त्यांनीं जें तुला एकही पत्र पाठविलें नाहीं त्याचें कारण माझ्या पूर्णपणें लक्ष्यांत आलें. मी जें कांहीं ऐकलें त्यावरून बोध होतो कीं, योगेंद्रांचें वर्तन अगदीं बिघडलें आहे. तुझें जसें त्यांचेवर प्रेम आहे, तसें कांहीं त्यांचें तुझेवर नाहीं. तरी पण तूं चिंता

करूं नकोस; ही गोष्ट तूं काळजी करशील ह्मणून प्रथमतः मी लिहिणारच नव्हतें, पण शेवटीं विचार केला कीं, खरी गोष्ट तुझ्यापासून दडवून ठेवणं रास्त नाहीं. तरी पण भिऊं नकोस; मी योगेंद्रांना लवकरच तिकडे घेऊन येण्याची तजवीज करत्यें. कळावें हे आशिर्वाद.

कमलिनी."

योगेंद्रनाथाला चक्कर आली. तें पत्र त्याच्या हातून गळून पडलें. हताश होऊन तो खालीं बसला आणि आकाशाकडे पाहून हात जोडून ह्मणाला, "दयामय ! तूं निर्माण केलेल्या या अपरिसीम जगतांतील मी एक क्षुद्र वालुकाकण आहें. विधात्या ! माझी शांति नष्ट करण्यासाठीं हें सर्व काण्ड होत आहे. जगदीश ! मी हीन, दीन, क्षुद्र ! तेव्हां या भीषण सागरांतून चित्तास स्थिर ठेऊन मी पार कसा जाऊं, हें तूं मला सांग. कृपामय ! मला बुद्धि दे ! बल दे !! हा सर्व प्रपंच लक्षांत येण्याजोगी मला शक्ति दे !!"

किंचित् स्थिर होऊन योगेंद्रानें दुसरें पत्र उघडून वाचलें:—

"प्रिय भगिनी,

तुला मी पूर्वींच कळविलेलें आहे कीं, योगेंद्रनाथ अगदीं साफ बिघडून गेले आहेत. एका कुलटेच्या पायीं त्यांनीं सर्वस्वावर पाणी सोडलें आहे. शिकणं-संवरणं आतां नुसतं नावाचं ! कॉलेजांत तर ते प्रायः जातच नाहींत. बिन्हाडींसुद्धां नांवाला येणं जाणं होतं. ऐकलं आहे कीं, ती × × मोठी कुत्सित बुद्धीची नी भारी लोभी आहे. पण या विषयीं तूं काळजी करूं नकोस; पुष्कळजण तारुण्यांत असे प्रमाद करतात, पण मग आपोआपच सुधरतात. बाकी हकिकत पुढील पत्रीं. कळावें हे आशिर्वाद.

कमलिनी."

योगेंद्र ताडकन् उठून उभा राहिला; व आपल्याशींच म्हणाला:—

"कोणाला माहित होतें ?—कोण जाणत होतें ? कीं, दुसऱ्याचा सर्वनाश करण्यासाठीं माणसें असा नीचपणाचा कळस करतील. कमलिनी—कलङ्किनी—सर्वनाशिनी कमलिनी—हें तुझेंच का काम ? क्षुद्र प्रवृत्तीला वश होऊन तूंच का हा सर्वनाश केलास ? दोन—दोनच कां—तीन निरपराधी व्यक्तींच्या शांतींत, सुखांत, आशेंत आणि जीवनांत

तूं माती कालविलीस. भगवन् ! तूं निर्माण केलेल्या सृष्टीचें मर्म कोण बरें जाणण्यास समर्थ आहे ? कमलिनीसारख्या सर्पिणीस तूं जन्माला तरी कशास घातलेंस ? ”

योगेंद्र पुनः विचार करूं लागला, “तर मग हरगोविंदबाबू निष्कलंकच का असतील ? काल मी त्यांस धडधडीत विनोदिनीशीं एकांतांत बोलतांनां पाहिलें ना ? कीं, माझे डोळे मला फसवीत आहेत ? हें गूढ कोण बरें मला उकलून देईल ? जो असें करील त्याच्या–होय, त्याच्या स्वाधीन मी आपला प्राणही करीन. ”

पुनः तो पत्र वाचण्यांत गढून गेला.

“ विनोद—

काल सकाळीं योगेंद्रांशीं माझी भेट झाली होती; पण दुःखाची गोष्ट ही कीं, त्यावेळीं मला समजून आलें, योगेंद्र अट्टल दारूबाज बनले आहेत ! ”

योगेंद्र आश्चर्यानें आत्मगत म्हणाला, “ काय मी अट्टल दारूबाज ? ”

तो पुढें वाचूं लागलाः—

“ त्यावेळीं ते पूर्ण निशेंत होते. तूं पाठविलेल्या पत्रांविषयीं मी अन् माधीनंसुद्धां त्यांनां विचारलें, तेव्हां ते म्हणाले, ‘ विनीचीं सारीं पत्रें मला पावलीं पण उत्तर धाडण्यास अद्यापि सवडच झाली नाहीं ! ! ”

हें वाचून योगेंद्र पुनः आत्मगत म्हणाला, धन्य आहे तुझी कल्पनाशक्ति ! धन्य तुझें कौशल्य ! एकूण विनोदिनीनें मला पत्रें लिहिलीं होतीं तर ! पण तीं माझे हातीं या दोघींनींच लागूं दिलेलीं नाहींत खास. ”

पुनः तो पुढचा भाग वाचूं लागलाः—

“ घरीं चलण्याविषयीं मी त्यांस विचारलं पण त्यांची नाखुषी दिसली. पण कांहीं झालं तरी मी त्यांनां घेऊन आल्याविना रहायचीच नाहीं. ”

“ **कमलिनी.** ”

या वेळीं योगेंद्राला पूर्णपणें कळून चुकलें कीं, ‘ विनोदिनी आपणांला पत्रें धाडीत होती, पण या दोघींच्याच कारस्थानामुळें तीं आपल्याला किंवा आपलीं विनोदिनीला मिळत नव्हतीं. त्याचप्रमाणें कमलिनीनें व माधीनें आजपर्यंत जें जें कांहीं आपणांस सांगितलें

तें तें निव्वळ खोटें ! ' हा विचार मनांत येतांच योगेंद्रांच्या मनांत आल्हाद, दुःख, भय, क्रोधप्रभृति विकारांनीं मोठी खळबळ माजविली. त्यानें पत्रें दूर फेंकून दिलीं. त्याचा जीव आतां इतक्या दिवसांनीं थोडा खालीं पडला. हरगोविंदबाबूंनीं हें सर्व आडून पाहिलें. आतां ते योगेंद्राकडे हळूहळू येऊं लागले. त्यांना येतांना पाहून योगेंद्र पुढें आला आणि सरळ भावानें म्हणाला, "मास्तर महाशय ! आपणच माझे गुरु ! माझे प्रधान सुहृद ! माझे निस्सीम हितचिंतक ! आपण मला पितृस्थानीं अहांत; मी जाणत नाहीं—मी कांहीं जाणूं शकतही नाहीं—माझे विरुद्ध काय हें सर्व कपटजाल विणलें गेलेलें आहे ? आपण काय तें आतां स्पष्टीकरण करा. हें गूढ आपल्याविना मला दुसरें कोणीही सांगूं शकणार नाहीं."

त्याचा हात धरून हरगोविंद बाबू म्हणाले, "धीर धरा. पहिल्यापासून नीट झालेली हकिकत सांगा आपण मला अगोदर."

योगेंद्रानें अथपासून इतिपर्यंत सर्व हकिकत त्यांस सांगितली. आपलें कलकत्त्यास जाणें, विनोदिनीकडून पत्रोत्तर न आल्या कारणानें आपणांस वाटलेला उद्वेग, आजार, कमलिनी आणि माधीचें आगमन, हरगोविंद व विनोदिनीस रात्रीच्या वेळीं एके ठिकाणीं पहाणें, विनोदिनीस लत्ताप्रहार करणें, कमलिनीच्या प्रेमाची कथा, या सर्व पत्रांचें वाचन वगैरे साऱ्या गोष्टी क्रमाक्रमानें त्यानें त्यांच्या कानांवर घातल्या. त्या ऐकून घेतल्यावर मास्तरमहाशय म्हणाले, "योगेंद्र ! आतां यावरून सर्व प्रकार नाहीं का आपल्या लक्ष्यांत येत ? माधी नेहमीं विनोदिनीनें तुम्हांस लिहीलेलीं पत्रें टपालांत टाकावयास व आपलीं आणावयास जात असे. पण ज्या अर्थीं आपलीं तिला व तिचीं आपणांला पत्रें मिळालेलीं नाहींत त्या अर्थीं कमलिनी व माधीचेंच हें कपट-कारस्थान आहे हें नाहीं का स्पष्ट दिसून येत ? कमलिनीची स्पृहाच या सर्व अनर्थाचें मूळ आहे. विनोदिनीविषयीं आपलें मन कलुषित झाल्याविना आपली कार्यसिद्धि होणें शक्य नाहीं असें जेव्हां तिच्या नजरेस आलें तेव्हां तिनें असें कारस्थान रचलेलें आहे. यावरून तिनें सांगितलेल्या सर्व गोष्टी साफ खोट्या आहेत हें आतां तरी आपल्या लक्ष्यांत आलेंच असेल. एक तर आपलीं पत्रें नाहींत म्हणून बिचारी विनोदिनी इकडे झुरत होती; त्यांत आपणांस दुर्व्यसनें लागलीं आहेत असें कमलिनी तिला

पत्रद्वारें कळवी. यामुळें तिच्या कोमल मनास केवढा जबरदस्त धक्का बसला आहे याची जाणीव आहे का आपणांस ? कमलिनी अशा शिताफीनें लिही कीं, तिचें सांगणें खरेंच असावें असें विनोदिनीलाच काय—पण कोणालाही वाटलें असतें. म्हणून त्या गरीब गाईला कांहींच उपाय नसल्यामुळें शेवटीं तिनें मला बोलावून सर्व हकिकत रडत रडत मला सांगितली. हीं सारीं पत्रें तिनेंच माझ्या हवालीं केलीं. पण तीं वाचून माझा कांहीं विश्वास बसेना. योगेंद्र ! संभव. असंभवाची विवेचना केल्याशिवाय एक दोन तुटपुंज्या गोष्टींवरून असल्या गोष्टी खऱ्या आहेत असें मानण्याइतका मी कांहीं आपणासारखा अविचारी नव्हतों."

योगेंद्र म्हणाला, " आपण वाटेल तर मला अविचारी—मूर्ख—म्हणा; पण त्या दोघींनीं मला नाहीं नाहीं त्या खोटया नाटया गोष्टी अशा तऱ्हेनें सांगितल्या कीं, त्या सर्व खऱ्याच असाव्यात असें मला वाटलें."

मास्तर महाशय म्हणाले, " तदनंतर मी विनोदिनीची पुष्कळ समजूत केली; व काय प्रकार आहे याचा तपास करून तुला कळवितों असें मी तीस आश्वासन दिलें. या गोष्टीस आज पंधरा दिवस होत आले. विनोदिनी केवळ माझ्या शब्दावर भरंवसा ठेवून आशेनें हा वेळपर्यंत कसें तरी जीवन कंठीत आहे. तिला धड भूक नाहीं, झोंप नाहीं. रडून रडून तिनें आपले डोळे मात्र सुजवून घेतले आहेत."

हें ऐकून योगेंद्राच्या डोळ्यांत पाणी आलें. मास्तर महाशय पुढें म्हणाले, " त्यानंतर तुम्हीं घरीं परत आलां; पण आल्यावरसुद्धां तिची भेट घेतली नाहीं. तेव्हां तिला केवढे कष्ट झाले असतील याची आपणांस कांहीं कल्पना आहे का ? ती करीत असलेला अनिवार शोक पाहून पाषाणासही पाझर फुटता; मग माझी ती काय कथा ?"

बोलतां बोलतां मास्तर महाशयांचे डोळे पाण्यानें भरून आले. योगेंद्राच्या डोळ्यांतून सुद्धां टिपें गळूं लागलीं.

हरगोविंदबाबू पुढें म्हणाले, " मी तिला पुष्कळ धीर दिला. उदयिक मी काय ती सारी हकिकत तुला कळवितों असें मी तीस सांगितलें आहे. चला योगेंद्र ! मी तुम्हांला आतां तिच्याकडे नेतों."

योगेंद्र मास्तर महाशयांचे चरण धरून म्हणाला, " आपण मला क्षमा करा. माझ्या हातून फारच अनुचित कर्म घडलें आहे. आपले मजवरील उपकार अनंत आहेत. आपणच माझ्या विनोदिनीचा आजपर्यंत प्राण वांचविला आहे; नाहींपेक्षां इतके दिवस ती जिवंत रहातीना."

मास्तर महाशय योगेंद्राला हातानें उठवीत म्हणाले, " यांत तुमचा काय दोष? तुम्हीं ज्या ज्या गोष्टी ऐकल्या, त्या साऱ्या खऱ्याच अशीच तुमची हा वेळपर्यंत भावना झालेली होती. असो. झालें तें झालें, आतां चला मजबरोबर."

चला तर ! योगेंद्र नम्र आवाजांत म्हणाला, ' पण विनोदिनीशीं मी हा जो अविचारानें वागलों त्याबद्दल तिचा स्वभाव मानी असल्या कारणानें खात्रीनें ती मजवर रागावेल दिसेलच काय तें आपोआप म्हणा."

दोघेही चालूं लागले. जातां जातां योगेंद्र उल्हासानें म्हणाला, " मास्तर महाशय ! मी आजच्या दिवसाच्या चिरस्मरणार्थ पांच जलहीन स्थानीं पांच तलाव खोदवीन व त्यांचें नांव ' विनोद वापी ' असें ठेवीन. कलकत्त्यास सर्वसाधारण लोकांच्या उपयोगासाठीं एक रम्य कानन बनवीन व त्याचें नांव ठेवीन ' आनंद कानन ' आणि वर्षोवर्षी आजच्याच दिवशीं येथील हीनदीन दंपत्यांस निमंत्रण करून त्यांस चांगलीं चांगलीं वस्त्रें वगैरे देऊन व चांगलें भोजन वगैरे घालून आनंदाचे सागरांत बुडवीन. या महोत्सवास मी ' मीलनमहोत्सव ' असें नांव ठेवीन."

मास्तर महाशय मनांतल्या मनांत म्हणाले:—

" योगेंद्र मनाचा अगदीं सरळ आहे खास ! "

---

# षोडश परिच्छेद.

## विष कीं अमृत.




दिवशीं पहांटेस अंतःपुराच्या एका खोलींत दुसरा एक प्रकार चालला होता. विनोदिनी त्या वेळीं त्या खोलींत बसून कसलेंसें एक पत्र लिहीत होती. इतक्यांत माधी तेथें आली. तिला पाहून विनोदिनीनें पत्र लिहिण्याचें थांबविलें. माधीच्याच द्वारें इच्छिलेलें आपलें काम उरकून घ्यावें असा तिनें विचार केला. तिनें म्हटलें, " माधी ! इतक्या पहांटेसशी आलीस आज ? "

माधी म्हणाली, " आलें सहजच आज ताईसाहेब ! पण हें काय ? तुम्हीं रात्रभर झोंपला नाहीं वाटतें ? डोळेही पहा किती लाल दिसतात ते ! "

विनोदिनी म्हणाली, " कसलीग आली आहे झोंप आतां ! "

" आतां आलें माझ्या लक्ष्यांत ताईसाहेब ! " माधी म्हणाली, " बाबूसाहेबांना दुसरी एखादी विनोदिनी मिळाली असेल असें मागें जें मी म्हटलें तेंच दुर्दैवानें शेवटीं खरें ठरलं. पण होणार गोष्ट चुकते थोडीच ! "

विषादपूर्ण मंद हास्य करून विनोदिनी म्हणाली, " अगदीं खरं आहे तुझें म्हणणें. "

" ताईसाहेब ! तुम्हीं वाटेल तें म्हणा, पण स्वामीशिवाय स्त्रियांनां दुसरी गति नाहीं. पतीचें सुख नसलें म्हणजे स्त्रियांच्या मनास भयंकर क्लेश होतात व झुरून झुरून त्यांची काय स्थिति होते हें पहावयास कांहीं फार लांब जावयास नको. तुमचेंच उदाहरण हें दाखवून देईल. चतर्जीबाबूंच्या धाकट्या सुनेनें याच कारणामुळें वैतागून विष खाऊन जीव दिला होता, हें आहे का ठाऊक तुम्हांस ? अहा ! कशी पण अगदीं नक्षत्रासारखी होती. थेट आपणासारखीच–इतक्याच वयाची. "

" तें माझ्याही कानावर थोडेंसें आलें आहे. पण ती विष खाऊन का मेली ? "

" होय, कुणाला सांगितलें नाहीं नी कांहीं नाहीं. गुपचुप विष खाल्लन् तिनं अन् जेव्हां प्राण निघून गेला तेव्हां कळलं मग साऱ्यांना. याप्रमाणें कितीतरी बायका त्रासून आत्महत्या करीत असतात ! "

आपणांस अनुकूल विषयावर चर्चा चाललेली पाहून विनोदिनीला मनांतल्या मनांत फार संतोष वाटला. तरी आपल्या मनांतील भाव प्रकट न करितां ती म्हणाली, " मोठेंच बाई साहस त्यांचें ! पण त्यांच्या मरणापासून त्यांच्या नवऱ्यास वाटलें का कांहीं दुःख?"

माधी मनांतल्या मनांत म्हणाली, " विनोदिनी भोळी, सरलहृदयी बालिका आहे. पतिप्रेमाचा महिमा जर कोणी जाणत असेल तर हीच एक ! पतिप्रेमाअभावीं फार दिवस ती मुळीं जगायचीच नाहीं. "

नंतर उघडपणें ती म्हणाली, " तें मी कसं सांगूं ? "

विनोदिनी दचकत म्हणाली, " पण त्यांना विष कोठून मिळालें ? "

हाय ! सर्वनाश ! ! विनोदिनीच्या मनांत काय आहे कोण जाणे !

माधी आत्मगत म्हणाली, " आतां छान संधि आहे. " नंतर उघड ती म्हणाली, " तें मला काय माहीत ? पण पसाऱ्यांकडे विकत मिळतें म्हणतात. "

" पसारी तर मोठे जुलूम करतात म्हणायचे. विष विकण्याची त्यांना म्हणे मनाई आहे. सरकारास कळलें तर त्यांना जब्बर शिक्षा होईल. "

माधी हंसून म्हणाली, " त्यांना का या गोष्टीचें भय नाहीं असें समजतां ? पण ते फार दक्षतेनें असलीं कामें करीत असतात. "

विनोदिनी म्हणाली, " ज्यांच्या मार्फत विष मागविलें जातें त्यांनीं जर भांडार फोडलें तर नाहीं का बिकट प्रसंग गुदरायचा ? "

" पण विष मागविणारे खात्रीच्याच विश्वासू माणसांद्वारें असलं काम करीत असतात."

" मग आमची माधी आहेच तशी विश्वासू. "

माधी चपापल्यासारखें दर्शवून म्हणाली, " मी आहें तशी विश्वासू म्हणा, पण देव करो, नी असलें काम करावयाचा प्रसंग मजवर न येवो. "

" पण माधी ! विष मागवून मला जवळ ठेवावयाचं आहे. "

" छट्, भलतेंच कांहीं तरी ! असल्या वस्तू काय जवळ बाळगावयाच्या असतात ? "

" कां बरं ? त्यांत कोणती हरकत ? एखादे दिवशीं तिकडची माझी भेट होईलच. त्या वेळीं तें विष मी तिकडे दाखवीन अन् आतां जर पूर्वींप्रमाणें कराल तर हें खावून मी मरेन अशी घालीन तिकडे भीति. माझी खात्री आहे माधी ! असं केल्यावर खात्रीनें ते आपला पूर्वक्रम सोडून देतील. "

माधी क्षणभर विचार करून म्हणाली, " आपलं म्हणणें एकार्थी खरें आहे. पण असल्या वस्तू जवळ बाळगण्याजोग्या नाहींत. चंचल मनाचा कुणी बाई नेम सांगावा ? "

" तूं का वेडी आहेस ? मी भलतंच कांहीं करीन असें का वाटतें तुला ? माधी ! तूं मनावर घेतल्यास एवढं माझें काम करशील अशी माझी खात्री आहे. "

" नाहीं बाई हें काम व्हायचं माझ्यानें. "

" तूं अगदीं भिऊं नकोस. मी तुला माझे पुष्कळसे दागिने देईन. पण अशी संधि घालवूं नकोस. "

" ठीक–पण–मी आपली गरीब माणूस आहें. "

विनोदिनी मध्येंच म्हणाली, " माधी ! आतां उगाच कशाला आढेवेढे घेतेस ? थोडेंसें विष जवळ असल्यावर जर माझें दुःख दूर होणारें आहे तर असें कांकूं कां ? "

" ताईसाहेब ! तुमच्या खातर मी सर्व कांहीं करीन. समुद्रांत जरी उडी टाकावयास सांगितली तरी आनंदानें टाकीन. मी कांहीं अशी खाल्ल्या घरचे वांसे—"

विनोदिनी मध्येंच म्हणाली, " तूं जाच गडे ! माझ्याखातर " इतकें म्हणून तिनें माधीच्या हातावर एक रुपया ठेविला. " बरें पहातें खटपट करून " इतकें बोलून तो रुपया घेऊन माधी निघून गेली. ती जातांच विनोदिनी अश्रूपूर्ण नयनांनीं हात जोडून म्हणाली, " हे करुणामय ! माधी ज्या कामासाठीं गेली आहे तें काम सफल होवो ! या जगांत या मंदभागिनीची समस्त शांति विषांतच समावेशित झालेली आहे. दयामय ! या शांतीपासून तूं मला वंचित मात्र करूं नकोस. "

विष आणण्यास माधीला पसाऱ्याच्या दुकानापर्यंतही जावें लागलें नाहीं. ती थोड्या वेळानें परत आली. तिला पाहून विनोदिनीनें तिच्या जवळ विचारिलें,

" कां, झालें ना काम माधी ? "

चोंहीकडे पहात पहात वस्त्राखालून लपवून आणलेलें विष माधीनें तिच्या हातीं देत म्हटलें, " हें मिळवावयाला किती पण प्रयास पडले म्हणून सांगूं ? पण हें बघा ताईसाहेब !

सावधगिरीनें उपयोगांत आणा; नाहींपेक्षां मी गरीब फुकटवारी मधल्यामधीं मारली जाणार."

विनोदिनीनें अमूल्य वस्तु समजून तें विष तिच्या हातून घेत घेत म्हटलें, "माधी! तूं अशी खुळ्यासारखी भितेस कां?"

नंतर तिनें आपली पेटी उघडून तींत तें विष जपून ठेविलें आणि पुनः पेटीस कुलुप लावुन चावी आपल्या गळ्यांत घातली.

माधी म्हणूं लागली, "हें मुळीं द्यायलाच कोण कबूल होईना; शेवटीं मोठ्या प्रयासानं मिळविलं मी!"

विनोदिनीनें हंसत हंसत म्हटलें, "माधी! यत्न केला तर रत्नसुद्धां मिळूं शकतें."

नंतर तिनें आपली दागिन्याची पेटी आणली व ती उघडून माधीस म्हणाली, "बोल यांपैकीं तुला काय काय हवं?"

ते अलंकार पाहून माधीस प्रबळ लोभ सुटला. ती म्हणाली, "काय घेऊं?"

"तुझ्या मनाला येतील ते."

इतकें बोलून माधीनें ती पेटीच तिच्या पुढ्यांत ठेविली. ती सगळीच घ्यावी असें एक वार माधीच्या मनांत आलें पण न्यावी कशी याचा तीस मोठा विचार पडला. ताईसाहेबांनीं ती सारी पेटी आंतील दागिन्यांसह मलाच बक्षीस दिलेली आहे असें कुणाला सांगितलें तर खरेंसुद्धां वाटावयाचें नाहीं; म्हणून जेवढे दागिने दडवुन नेतां येतील तेवढेच नेणें बरें असें वाटून माधीनें निवडून निवडून कांहीं अलंकार घेतले. असें करतांना तिनें एक वार चोरट्या नजरेनें विनोदिनीकडे पाहिलें. त्या वेळीं तिच्या मुद्रेवर विरक्तीचें चिन्ह तिला कांहींसें दिसून आलें. विनोदिनी तिला म्हणाली, "आणखी घेनाग माधी!"

माधी म्हणाली, "नको ताईसाहेब! मी गरीब माणूस. आणाखी घेऊन काय करूं?"

माधीनें सुमारें दीड हजार रुपयांचे दागिने निवडून घेतले; तरी तिला लोभ कांहीं सुटेना पण मुख्य अडचण काय ती दडवून नेण्याची. शेवटीं निरुपाय होऊन ती म्हणाली, "पुरे आतां, माझ्या बापदाद्यांनीं एवढे दागिने स्वप्नांतसुद्धां कधीं पाहिले नसतील."

माधीनें पुनः आपली लोभी दृष्टि त्या दागिन्याच्या पेटीकडे वळविली. पुनः ती मागें एक पाऊल हटली आणि भयचकित मुद्रेनें तिनें आसपास पाहिलें. नंतर ती म्हणाली, " येतें मी आतां ताईसाहेब ! विष मात्र संभाळून ठेवण्याची खबरदारी घ्या. "

विनोदिनीनें म्हटलें, " तें का मला सांगायला हवें ? "

माधी आतां तेथून निघून गेली. आपण आणून दिलेलें विष कोणत्या कामीं येणार हें तीस पूर्ण माहित होतें. ज्या हेतूनें ती विनोदिनीकडे आज आलेली होती, तो तिचा हेतु सफल झाला.

जों पर्यंत माधी दृष्टीला पडत होती तों पर्यंत विनोदिनी तिच्याकडे पहात राहिली होती. ती दृष्टी आड होतांच विनोदिनी आत्मगत म्हणाली, " माधीचे आजचे उपकार दागिन्यांनींसुद्धां फिटायचे नाहींत. "

नंतर तिनें पेटी उघडून तें विष बाहेर काढलें व जमिनीवर गुडघे टेंकून विषपात्राकडे पहात पहात ती म्हणाली, " हे जगदीश ! मी आपला क्षुद्र जीवनप्रदीप स्वतः आपण होऊनच विझवीत आहें; याचा दोष कुणावरही नाहीं. दयामय ! तुझ्या दयेला सीमा नाहीं. ज्याप्रमाणें तूं मानवी जीवनास अनंतयातनामय करावयास शक्त आहेस, त्याच प्रमाणें इच्छा होतांच यातनामुक्तही करावयास समर्थ आहेस तर मग हीं महौषधि सेवन करून मी कां म्हणून यातनायंत्रणेपासून मुक्त होऊं नये ? "

" योगेंद्र! या दुःखिनीचें हृदयरत्न ! आपल्या विना—आपल्या कृपेविना—मी जिवंत राहूं शकेन असं का वाटतं आपणांला ? चंद्र-सूर्य स्थानच्युत होतील, पृथ्वी दुभंगून जाईल, महासागरही एखादेवेळीं जनस्थानावर अंमल गाजवील. तरीही आपल्यासाठीं हे प्राण वाचूं शकतील. परंतु आपल्या प्रेमाविना—आपल्या कृपेविना—ही विनोदिनी एक क्षणही जिवंत रहावयाची नाहीं. "

एवढें बोलून त्या कोमलांगी युवतीनें विषपान केलें. नंतर हात जोडून ती म्हणाली, " कृपामय जगदीश ! केवढं विष पोटांत गेल्यानें माणूस मरतें तें मी कांहीं जाणत नाहीं. तरी पण या अभागिनीच्या पोटांत गेलेल्या विषाचें विषारित्व मात्र दूर करूं नकोस म्हणजे झालें. "

---

# सप्तदश परिच्छेद.

## सत्यानाश.



हरगोविंदबाबू आणि योगेंद्रनाथ परत घराकडे यावयास निघाले असतां वाटेंतच त्यांस माधी भेटली. या पृथ्वींत पाप वाढविण्यासाठींच माधीसारख्यांचा जन्म झालेला असला पाहिजे. ती जरी सर्व प्रकारच्या पापकार्यांत परिपूर्ण होती तरी आतां तर तिनें पापाची पराकाष्ठा केलेली होती. पापामुळें तिचें हृदय पाषाणवत् बनलें होतें. स्वार्थासाठीं मानवी प्राणी काय काय अनान्वित पातकें करावयास प्रवृत्त होतो हें जर पहावयाचें असेल, तर वाचकहो ! माधीच्या पात्राकडे पहा. माधी, विनोदिनीनें दिलेले अलंकार दडवून नेतांनां साहजिकच भयभीत मुद्रेनें सभोंवार मधून मधून नजर फेंकी. तिला समोरून येतांनां पाहतांच योगेंद्र संतापला. तो तिला म्हणाला, " माधी ! तुझीं शंभर वर्षें आतां भरत आलीं आहेत समजलीस ? "

माधी घाबरून गेली. तिच्यानें कांहीं उत्तर देववलें नाहीं. योगेंद्र तीस पुनः म्हणाला, " तुझ्यामुळें कसा सर्वनाश झालेला आहे हें जाणतेस का तूं ? "

'सर्वनाश' हा शब्द ऐकतांच माधी चपापली. तरी पण भीत भीत तिनें विचारिलें, " मी काय केलं बाबूसाहेब ? "

योगेंद्र क्रोधानें गर्जून म्हणाला, " काय केलेंस ? पापिणी ! असत्य बोलून आणखी काय केलें म्हणून वरती विचारावयास लाज नाहीं वाटत ? चंडाळणी ! तूं स्त्री आहेस तसी तुझी उपेक्षा करतां कामा नये. "

माधी लटलटां कांपूं लागली. योगेंद्राला विषासंबंधीं कळून चुकलें आहे अशी तिची समजूत झाली. तरी गोष्ट दबल्यास दाबून टाकावी या उद्देशानें ती म्हणाली, " माझा काय दोष यांत ? मला काय माहीत ? "

योगेंद्र पुनः रागानें म्हणाला, " खोटें बोलण्याची तुझी संवय या जन्मीं तरी नाहीं जावयाची. विनोदिनीनें मला लिहीलेलीं पत्रें मला कशीं मिळालीं नाहींत ? खरें सांग, नाहीं तर] याद राखून ठेव. तुला ठार करून टाकीन. "

रुद्ध कंठानें माधी म्हणाली, " तें का मी स्वतःच्याच इच्छेनें केलें ? मला थोरल्या बाईसाहेब—"

" पुनः खोटें ! चंडाळणी ! " योगेंद्र मध्येंच संतापून म्हणाला, " तुझी बाईसाहेब इतक्या दुष्टबुद्धीची नाहीं. मी तुझा सर्वनाश करीन तेव्हांच आतां सोडीन.

हें ऐकून माधी रडूं लागली.

" त्याच वेळीं मला वाटलें होतं कीं, मी गरीब मात्र मधल्यामधीं मारली जाणार. " रडत रडत ती म्हणाली.

योगेंद्र म्हणाला, " चंडाळणी ! तुला गरीब कोण म्हणेल ? तुझ्यासारखी पापिणी या दुनियेंत कोणी नसेल. विनोदिनी व हे मास्तर महाशय यांचा वाईट संबंध आहे असें तूंच नव्हे का या तोंडानें सांगितलें होतेंस ? तुझे तुकडे तुकडे करून श्वानांकडून आतां खाववितों थांब. "

मास्तर महाशय गंभीरतेनें म्हणाले, " माधी ! तुझ्या पापाला पुरेशी शिक्षा या जगांत नाहीं. "

माधीनें पाहिलें, आपल्या पातकाचा आतां पूर्ण घडा भरला आहे. सर्व कांहीं यांनां कळून चुकलें आहे. ती अगदीं रडकुंडीस येऊन गयावया करीत म्हणाली, " हें सर्व थोरल्या बाईसाहेबांमुळें झालें. माझा यांत कांहीं दोष नाहीं. मला आपण क्षमा करा. थोरल्या बाईसाहेब आपणांवर अनुरक्त झाल्या त्याला मी काय करूं ? "

इतकें बोलून ती उभयतांच्या पायां पडली. त्याचवेळीं तिनें छपवून ठेविलेले दागिने सारे चटकन् खालीं पडले. योगेंद्रानें पहातांक्षणींच ते विनोदिनीचें म्हणून ओळखले. त्या सरशीं घाबरून त्यानें विचारिलें, " हें काय माधी ! ही आणखी दागिन्यांची काय भानगड ? "

आतां पुरा सत्यानाश झाला हें माधीला पुरतें कळून चुकलें. दागिने तर योगेंद्राच्या पूर्ण ओळखीचे असल्यामुळें माधीला बोलावयाला तोंड राहिलें नव्हतें. ती मास्तर महाशयांचे पाय धरून म्हणाली, " माझ्या पापास सीमा नाहीं. माझें वाटेल तें करा. "

याच वेळीं जवळच असलेल्या योगेंद्रबाबूच्या घरांतून क्रंदनध्वनि ऐकूं आला त्यासरशीं योगेंद्र व मास्तर महाशय लगबगीनें घराकडे धांवले. माधी अलंकार तेथेंच टाकून निघून गेली.

त्याच दिवशीं सायंकाळीं माधीचें प्रेत तळ्यांत तरंगतांनां लोकांनीं पाहिलें.

---

# अष्टादश परिच्छेद.

## अपूर्व मीलन.



मास्तर महाशय आणि योगेंद्रबाबू लगबगीनें घरांत शिरले तों विनोदिनीच्या खोलींतून भीषण क्रंदनध्वनि त्यांच्या कानावर आला. त्यासरशीं मास्तर महाशय घाबरून म्हणाले,

" हाय ! घात झाला वाटतें. "

योगेंद्र कातर स्वरांत पुटपुटला, " मला वाटतें, विनोदिनी मला सोडून जावयास पहात आहे. पण मी नाहीं तिला जाऊं देणार. "

दोघांनींही विनोदिनीच्या खोलींत प्रवेश केला त्यासरशीं सर्व नाश झाला आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. विनोदिनी जमिनीवर पडली होती व तिचे आप्तगण आजुबाजूला जमा होऊन शोक करीत होते. हे दोघेजण आंत येतांच सर्वजण जास्तच रडूं लागले. विनोदिनीची माता कपाळावर हात मारून म्हणाली, " योगिन् ! बाबा ! विनोदिनीनं विष खाल्लं रे ! "

अजून पावेतों योगेंद्राच्या डोळ्यांतून जलबिंदु निघाले नव्हते. चैतन्यहीन माणसाप्रमाणें त्याची अवस्था झाली. त्याचे नेत्र स्थिर व उज्ज्वल दिसूं लागले. ' योगिन् ! ' हें नांव विनोदिनीस ऐकूं आलें. त्यासरशीं तिनें डोळे उघडून चोहींकडे पाहिलें. हळूहळू योगेंद्र तिच्या उशी जवळ येऊन बसला. विनोदिनीच्या मुकुलित नेत्रांचें व योगेंद्राच्या स्थिर नेत्रांचें मीलन झालें. योगेद्रानें तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले. त्या वेळीं तिच्या मृत्युपीडित वदनावर हास्य विलसूं लागलें.

नंतर मास्तर महाशयांनीं विनोदिनीच्या मातेला व इतर सर्वांनां त्या खोलींतून बाहेर नेलें. आतां खोलींत फक्त विनोदिनी व योगेंद्र हीं दोघेंच जणें राहिलीं. तेव्हां विनोदिनी म्हणाली, " नाथ ! मला क्षमा करा. "

" वेडी कुठली ! तुला ही दुर्मति कशी सुचली ? मला सोडून का तूं जाण्यास इच्छितेस ? "

विनोदिनी डोळे बंद करून म्हणाली, " तुम्ही पुरुष भारीच बाई निर्दय मनाचे. "

" नाहीं. लाडके ! तुझा योगेंद्र निर्दय नाहीं. "

नंतर त्यानें तिला अथपासून इतिपर्यंत सर्व हकीकत थोडक्यांत सांगितली. ती ऐकतांच विनोदिनीच्या नेत्रांवाटे घळघळां अश्रु वाहूं लागले.

योगेंद्रानें विचारिलें, " रडतेस कां विनोद ? "

विनोदिनीने रडत रडत म्हटलें, " एका तासा पूर्वी जर कोणी येऊन ही हकीगत मला सांगता तर मी माझें हें रत्न सोडून अशी जातें ना; पण आतां जीव वांचण्याचा कांहींच मार्ग नाहीं. "

" असें काय बरें करतेस विनोद ? तुझा जीव वांचण्याचा आतां कांहींच उपाय नसला तरी माझ्या मरणाचा उपाय तर माझे हातीं आहे ना ? "

सजल नयनांनीं योगेंद्राचे हात धरून विनोदिनी म्हणाली, " नका असं भलतंसलतं बोलूं; अजून आपलं वय आहे. संसार अजूनही आपणांस सुखदायी निवडेल. "

" संसाराशीं मला आतां काय करावयाचें आहे ? "

विनोदिनी म्हणाली, " हृदयेश्वर ! माझी घटका आतां भरत आली आहे. योगिन् माझेच अद्यापि आहेत हें पाहून मरतांनासुद्धां मला अपरिमित आनंद वाटत आहे. हीच गोष्ट जर थोडा वेळ अगोदर समजती तर मरणासंबंधीं विचारसुद्धां मी मनांत आणिला नसता. "

सुंदरी बराच वेळ स्तब्ध राहिली. शेवटीं रडत रडत ती म्हणाली, " माझ्यानं आतां बोलवत नाहीं योगेंद्र ! "

विनोदिनीचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन योगेंद्रानें तिच्या शीत ओष्ठांचें चुंबन घेतलें. नंतर तो म्हणाला, " दुःख म्हणजे निव्वळ भ्रांति ! संसार पापमय ! जगत् स्वार्थी ! पण परलोकीं शत्रुत्व नाहीं, पाप नाहीं, दुःख नाहीं, कांहीं नाहीं. मग कशाचें भय ? "

विनोदिनी वर दृष्टि करून म्हणाली, " जगदीश्वर ! ज्यांच्यामुळें आमचा असा विच्छेद झाला आहे, त्यांस मात्र हें पाप न लागो ! "

विनोदिनी आतां स्तब्ध राहिली. योगेंद्राचे मुखाकडे तिनें एकसारखी आपली दृष्टि लाविलेली होती. तिच्या डोळ्यांतून अश्रु एकसारखे गळत होते. त्यामुळें तिचें वक्षःस्थल भिजून अगदीं चिंब झालें होतें. पण योगेंद्राच्या डोळ्यावाटे एक टीपही आलें नव्हतें. त्याची विनोदिनी–त्याची तीच विनोदिनी—हाय ! त्याच्या अंकावर रडत पडली होती. मृत्यु हळुहळू तिजवर आपला पाश टाकीत होता. योगेंद्रनाथ सर्व कांहीं समजून चुकला होता. पण त्यानें आपलें मन घट्ट केलें होतें. त्याची मुद्रा अधिकाधिक गंभीर होत चालली होती. जणूं काय एखाद्या अचेतन पुतळ्याप्रमाणें त्याची अवस्था झाली होती. त्याचे नेत्र श्वेत व निष्प्रभ झाले होते व देहही काष्ठासारखा होऊं लागला होता.

विनोदिनीचा जीवनदीप निर्वाण पावण्यास आतां विलंब नाहीं हें त्याच्या लक्षांत आलें. विनोदिनीनें एक वार बोलण्याचा प्रयत्न केला, पण तिच्यानें बोलवलें नाहीं. तिनें आपला शक्तिशून्य हात उचलून योगेंद्राच्या कंठांत मिठी मारिली. योगेंद्रानें तिचें एकवार शेवटचें चुंबन घेतलें. मृत्यूचीं चिन्हें आतां स्पष्ट दिसूं लागलीं होतीं.

अस्फुट स्वरांत विनोदिनीनें जातां जातां हांक मारिली, “ यो–गी—”

झालें ! आटोपलें ! ! साध्वी विनोदिनी कायमची या जगाला सोडून गेली ! ! !

मृताच्या छातीवर पडलेल्या व्यक्तीनें एक वार वर पाहिलें. तिनें कांहीं बोलण्याचा प्रयत्न केला. पण तो व्यर्थ गेला. एक क्षणिक अपरिस्फुट ध्वनि मात्र ऐकूं आला. या जगांत पुनः त्या निष्कलंक देहांत प्राण कांहीं आला नाहीं ! ! !

थोड्या वेळानंतर हरगोविंदबाबू आंत आले त्यांनीं काय पाहिलें ? पाहिलें कीं, दोन्ही प्रेममय पक्षी उडून गेले आहेत. त्यांचे जड देह मात्र राहिले आहेत. दोन सुकुमार कुसुमें नष्ट झालीं आहेत.

हें हृदयद्रावक दृश्य पाहून मास्तर महाशयसुद्धां रडूं लागले.

याच वेळीं कमलिनी, उन्मादिनीसारखी त्या ठिकाणीं धांवत आली. थोडा वेळ पर्यंत त्या कुलकलंकिनीनें आपल्या पराक्रमाचा परिणाम एकाग्रतेनें पाहिला. नंतर विकट हास्य करून टाळ्या वाजवून ती म्हणाली, “ योगेंद्र ! ! ! ”

हाय ! हाय ! ! लोकांचा सोन्याचा संसार क्षणांत धुळीला मिळाला ! ! !

समाप्त.